# श्री सद्धर्म-बोध.

# TRUE RELIGIOUS, TEACHINGS,

*by*

SHRI AMOLAKHRISHIJEE,

रचयिता,

बालब्रह्मचारी श्रीअमोलकऋषिजी महाराज.

प्रसिद्धकर्ता,

श्री उदयराज कालुराम,

मु० ढाणकी-( जि.-यवतमाल. )

आवृत्ति, ११ वी, २[illegible]००

मूल्य-सद्धर्मस्वीकार

सर्व प्रति, १८०००

श्री वीराब्द २४५१, विक्रमार्क १९८१, इसवी १९२४

# अर्पणपत्र.

पूज्यपाद महात्मा स्याद्वाददर्शक गुरुवर्य
श्रीरत्नऋषिजी महाराज! मला दीक्षारूप
सत्पदाचे देणारे आणि सद्ज्ञान
सद्द्रव्याचे देणारे, परमोपकारी
आहात आपली मिळेली
प्रसादीचे प्रसादानेंच
मी ग्रंथ लिहिण्यास
समर्थ झालो, या-
स्तव हा ग्रंथ आ
प[illegible] सम
र्पण करून त
कृज्ञ होत
आहे
!

दास,
अमोलकऋषि.

# आभार पत्र.

परमोपकारी स्थविर पद विभूषित पूज्य श्री
रत्नऋषि महाराजाचे शिष्यवर्य व्या-
करणवेत्ता मनोहरव्याख्यानी
श्री आनंद ऋषिजी महाराज !
आपण आम्हावर कृपा करून
ह्या ग्रंथाची महाराष्ट्रिक
भाषा शुद्ध करून
दिली यास्तव
आम्ही आप-
ले फार आ-
भारी आ-
होत !

गुणानुरागी,
उदयराज कालूराम
मु० ढाणकी–जि यवतमाळ

— ※०※ —

# प्रस्तावना.

— ❀ —

जगातील सर्व प्राण्यास निरंतर सुखी राह-ण्याची इच्छा असतें आणि त्याच्या प्राप्तिस्तव सर्व प्राणी यथाशक्ती प्रयत्न करीत असतानाही तें प्राप्त होत नाहीं याचें कारण काय असावें ? या प्रश्नाचें समाधान असें होतें, कीं इच्छेप्रमाणें कर्तव्य नाहीं ! ह्मणजे रोगाचा खरा प्रतिकार मिळाल्यावांचून जसा रोगनाश होत नाहीं तसें अक्षयसुख प्राप्त होण्याचें खरें साधन मिळाल्या-वांचून अक्षय सुखही प्राप्त होत नाहीं अशा खऱ्या कारणाच्या अभावानेंच जगातील थोडे प्राणी सुखी आणि पुष्कळ दु:खी दिसतात; आणि त्यांना जें काहीं थोडें सुख प्राप्त जाहालेलें असतें तें देखील शाश्वत नसतें प्राप्त सुखाचा नाश झाल्यानंतर सुखार्थी प्राणी सुखाकरीता तळ-मळतात. हें पाहून महात्मा पुरुषाच्या अंत:कर-

णात दया उत्पन्न होऊन आपले अनुभविक उपाय ज्याचा त्याना पूर्णपणें भरवसा झाला आहे व ते त्याच साधनाच्या योगानें अक्षय सुखी बनले आहेत, अशा ज्ञानाचें दान अक्षय सुख इच्छिणाऱ्या प्राण्याना करण्याकरिता, ज्या ज्या भाषेंत सर्वांस समज पडेल उमजेल रुचेल त्या त्या भाषेंत अनेक शास्त्र व ग्रथ निर्माण केले आहेत परतु ह्या कलिकाळात आयुष्यही स्वल्प आहे आणि बुद्धिही तशी तीव्र नसल्यामुळें सर्व शास्त्र शोधून चिरकालीन सुखसाधनाचा उपाय हातीं लागणें फारच कठीण आहे ह्या कठिणत्वास दूर करण्यास्तव या काळाच्या चिरसुख इच्छुकें प्राण्याना सत्य उपाय दाखविण्याकरिता पुरातन मोठ मोठें शास्त्र व ग्रन्थाचें अवलोकन करून त्याचा साराश सक्षेपांत समज पडेल या रीतीनें लहान लहान ग्रन्थ केले आहेत, व करित असतात, त्याच प्रमाणें या ग्रंथाचे कर्ते जैन धर्मी

साधुमार्गी पथाचे परमपूज्य श्रीकहानऋपिजी महाराजाच्या सप्रदायाचे बालब्रह्मचारी पंडित मुनि श्री अमोलक ऋषिजी आहेत, त्यानीं जैनतत्त्व प्रकाश, परमात्ममार्गदर्शक, मुक्तिसोपान, ध्यानकल्पतरू, धर्मतत्व संग्रह अघोद्धार कथागार, प्रमुख अनेक ग्रन्थ, आणि मदनशेट, चन्द्रसेन, वीरसेन, भीमसेन, सिंहकुमर मदिरासती, भुवन सुन्दरी, वगैरे चरित्रें इत्यादिकाची रचना केली आहे आणि जैन धर्माचे परम माननीय ३२ शास्त्र अर्ध मागधी भाषेंत आहेत त्याचा हिन्दीभाषानुवाद केला आहे. आज पर्यन्त लहान मोठे सर्व ७७ प्रकारचे शास्त्र तथा ग्रन्थाची १५०००० प्रति प्रसिद्धींत आणल्या आणि अमूल्य दिल्या आहेत आणखी नवीन ग्रन्थाची रचना करित आहेत आणि प्रसिद्धींत आणण्याचा प्रयत्न चालू आहे

हे महाराज कविवरेन्द्र पूज्य श्रीतिलोकऋपिजी

महाराजाचे पाटविय शिष्यवर्य स्याद्वादवारिधि पर-
मोपकारी श्रीरत्नऋषिजी महाराजाच्या समागमें वि.
स. १९५४ चे फाल्गुन मासात महाराष्ट्र देशात
आले, आणि प्रथम चातुर्मास घोडनदी [पुणें]
येथें करून मराठी भाषेचा अभ्यास केला आणि
अहमदनगर, कर्माळें, कुकाने, कान्हूर येथें चातु
र्मास केले पुष्कळ गावें पावन करित करित, आ
मच्या पुण्योदयानें स० १९६३ चे सालीं तपस्वी
राज श्री केवलऋषिजी महाराजाचे समागमें मा-
र्गांत महा कष्ट सोसून दक्षिण हैदराबाद पावन
केला या शहरात अशा कनककान्ताचे त्यागी
पायचारी निर्दोषआहारी सत्पुरुषाचे आगमन
कधींही झाले नव्हते म्हणूनच येथील लोकाना
जैन साधुचा वेश फारच आश्चर्यकारक वाटला
नन्तर हिंदी मारवाडी मराठी, गुजराती ह्या
चार भाषामध्यें उपदेश ऐकून शिथिल झालेले
जैन दृढधर्मी झाले इतर अनेक लोकानीं

देखील जैनधर्माचा स्वीकार केला, आणि राजा बहादुर लालाजी सुखदेव सहायजी ज्वालाप्रसादजी सारखे राजमान्य श्रीमान् सद्गृहस्थ जैनधर्माचे प्रेमी बनून ३२ शास्त्रें ४२००० रुपे खरच करून छापविले आणि अमूल्य दिले सर्व १५०००० रुपे जैनधर्मोन्नति करिता लागले इतर अनेक सद्गृहस्थानीं जीवरक्षा आणि ज्ञानवृद्धीकरिता हजारों रुप रव केले ४ सत्पुरुषानीं दीक्षा घेतली महाराजाचे सद्ज्ञान प्रसादीरूप अमृताच्या गोडीसाठीं लुब्ध होऊन महाराष्ट्र (दक्षिण), मालवा, मेवाड, मारवाड, पजाब, कच्छ, काठीयावाड, गुजरात, करनाटक, इत्यादि अनेक देशाचे लोक दरचेवर येत होते आणि हजारों रुपे ज्ञानवृद्धित व जीवदयेंत लावित होते

महाराष्ट्र देशाच्या कित्येक धर्मेच्छु लोकांचे ह्मणणें झाल, कीं मराठी भाषेंत सर्वांस उपयुक्त असा एक लहानसा ग्रंथ प्रसिद्ध होईल तर मह-

त् उपकार होईल ही विनती महाराजानी मान्य करून " प्राणी हिंसा निषेध " नावाचे गुजराती पुस्तकाच्या व अनेक मताच्या शास्त्र व ग्रथाच्या आधारानें हा ग्रन्थ लिहून " सद्धर्म बोध " असें गुणनिष्पन्न नाव स्थापन करून प्रथमावृत्ति येथील ज्ञानवृद्धी खात्याकडून प्रसिद्ध केली ज्या ज्या स्थानीं हें पुस्तक पहोंचले त्यापैकी पुष्कळ स्थानाहुन आह्मास पत्र मिळाले कीं आपले पुस्तकानें येथें फार उपकार झाले आहेत, मोठमोठाले राजवर्गी विद्वान पुरुषानीं पसन्त केले आहे पुष्कळ मनुष्यानीं जीववध करण्याची, मास आहार, रात्री भोजन, अणगळ पाणी आदिची शपथें घेतली आहेत द्वितीयावृत्ति नाशिक जिल्याचे श्रावकानीं, तृतीयावृत्ति औरगावादचे श्रावकानीं, चतुर्थावृत्ति खानदेशाच्या श्रावकानीं आणि पचमावृत्ति बालेघाटच्या श्रावकानीं प्रसिद्ध केली

महाराजश्रीनें शास्त्रोद्धाराचा काम समाप्त करू-

न, करनाटक देश पावन केला, रायचूरच्या श्रावकाचे अत्याग्रहानें तेथें चातुर्मास केला तथा धर्माथ ७००० रु खर्चे वगैरा महा उपकार झाला तिथले राजाराम मास्तरानीं ह्या पुस्तकाचें कनडी भाषान्तर करून दिलें व तें प्रसिद्ध झालें पुन्हा बेंगलोरचे श्रावकाच्या अत्याग्रहानें केलेली विज्ञप्ति ऐकून महाकष्ट सोसून महाराजश्री बेंगलोरास गेले या पुस्तकाचा हिंदी भाषेंत अनुवाद स्वय महाराजश्रींचे हातानें वडनेराचे श्रावकांनीं करावून प्रसिद्ध केला अशी १० आवृत्ति निघाली तें सर्व सपली

म्हेसुर प्रातातील बेंगलोर सारख्या मोठ्या शहरामध्यें उक्त महाराज साहिब सारखे शुद्धाचारी आणि षट्दर्शनाचें ज्ञाते पडित साधुचे कधीं येणें झालें नव्हते, म्हणूनच लोकाचा धर्मोत्साह फार वाढला अनेक मताच्या दागस्यानीं जैनमताचा प्रत्येक सिद्धान्त सिद्ध करून दाखविल्यामुळें जज्ज साहेब वगैरे अनेक लोकानीं मास भक्षण कर

ण्याचा परित्याग केला, त्याच प्रमाणें अनेकानीं, मदिरापान करणें, वेश्यागमन करणें द्यूत खेळणें, चोरी करणें, परस्त्रीगमन करणें वगैरे कुव्यसन सेवन करण्याच्या शपथा घेतल्या दोन कपायानीं आपल्या कपायाचा धदा सोडून त्यानीं किराण्याच्या दुकाना घातल्या गोरक्षण सस्था, जैन लायब्रेरी, वगैरे सस्थाची स्थापना झाली, २५-३० ह० रु० चा खर्च धर्मार्थ झाला. या पुस्तकाच्या त्या ठिकाणी केनर्डी मार्पेत तीन आवृत्तींची ४००० पु कें धर्मप्रेमी गृहस्थानीं प्रकाशित करुन अमूल्य दिली कृष्णराव साहेब मारख्या सद्गृहस्थानें या ग्रन्थाचे पठन करून आपल्या मर्व कुटुम्बाला सांतिलें आणि सर्वांना मास, मदिरा, रात्रि भोजन, अणगळ पाणीची शपथ दिली असें ह्या पुस्तकानें फारच उपकार झाले आहेत या वर्षींही करनाटक देशाच्या लोकानीं आणि हैदराबादच्या लोकानीं अत्याग्रहानें स्वदेश पावन करण्याची विज्ञप्ति महाराजांना केली होती परन्तु आपले गुरुवर्य पूज्य श्रीरत्नऋषि-

श्री महाराजाच्या आज्ञेप्रमाणें आणि आमचे भाग्योदयानें इकडे (महाराष्ट्र देशात) महाराज श्रीचे येणें झाले इकडिल प्रातामध्यें या पुस्तकाची लोकाना अत्यावश्यक्ता आहे असें जाणून या पुस्तकास छापविण्याचा विचार झाला तेव्हा पुज्यश्री रत्नऋषिजी महाराजाचे शिष्यवर्य श्री आनद ऋषिजी महाराजाजवळ याची भाषा शुद्ध करून महाराजश्रीनीं पुन शुद्धि वृद्धि सहित उतारा करून दिला तदनुसार ही ११ वी आवृत्ति छापवून माझे शुद्ध सत्य धर्मेच्छु धर्मप्रेमी लोकाच्या करकमलात समर्पण करून विज्ञप्ति करितो, कीं या ग्रथाचे दत्तचित्तानें पठन मनन करा, आणि जर पुस्तकात सांगितलेला उपदेश आपणास हितकारक दिसला तर आपण त्याचा स्वीकार करून इहलोकीं यशाचे भागी, परलोकीं स्वर्ग मोक्षान्तें सुखोपभोगी व्हा.

वीर सम्वत २४५०
विक्रमार्क १९८१
श्रावण शुक्ल ९

शुद्ध धर्म वृद्धीच्छुक
उदयराज कालुराम
मु० दाणकी–( जि. यवतमाल. )

जैनामूल्यसुधा

श्री परमात्मने नमः ।

# सद्धर्म-बोध.

## मंगलाचरणम्

परमेश्वरं नमस्कृत्य । धर्मबोधादिदायकम् ॥
वक्ष्येऽहमात्मोद्धारार्थं । ग्रन्थं सद्धर्मबोधकम् ॥१॥

अर्थ—आद्य धर्मोपदेशक, सद्बोधाचे दातार श्री परमेश्वरास नमस्कार करून, स्वतःच्या आणि दुसऱ्याच्या आत्मकल्याणाकरिता मी ह्या सद्धर्मबोध ग्रन्थाचा आरम्भ करितों, तो सर्वांस हितदायक होवो

## पशु आणि मनुष्य ह्यांत भेद

आहारनिद्राभयमैथुनानि ।
तुल्यानि सार्धं पशुभिर्नराणाम् ॥

धर्मो विशेषः खलु मानुषाणां ।
धर्मेण हीना पशुभिः समाना ॥ १ ॥

सर्व अध्यात्मिक महान् पुरुषानीं आणि सर्व शास्त्रानीं जगातील सर्व योन्यपेक्षा मनुष्यजन्माची दुर्लभता दाखवून त्याची फारच आवश्यकता आणि परमोत्कृष्टता दाखविली आहे, याचें मुख्य कारण काय असावें ? ह्या प्रश्नाचा उद्भव अन्तःकरणात स्वाभाविक होतो का कीं ज्याप्रमाणें मनुष्य आहारा ( भोजना ) चा उपभोग घेतो, झोंप आली असता झोंप घेतो, भयकारक वस्तूना भितो आणि विषयोपभोगात रत होतो व स्वकुटुम्बाचें पालन पोषण आणि शत्रुचा तिरस्कार करितो, त्याच प्रमाणें जगातले सर्व प्राणी पशु—गाय म्हशी घोडा इत्यादि पृथ्वीवर चालणारीं चतुष्पद जनावरें, चिमणी राघु कावळे इत्यादि आकाशात उडणारे पक्षी, आणि अपदि--सर्प अजगर वगैरे सरपटणारे प्राणी, आहार करितात, निद्रा घेतात वैभव

आणि विपयोपभोग भोगितात, स्वजनाचें पालन आणि शत्रूचा तिरस्कार यथाशक्ति करितात मग मनुष्यजन्मात विशेप काय आहे? तसेंच जर आकृतिसम्बन्धी विचार केला तर माकडाच्या शरीराची आकृति (घटना) व मनुष्याच्या शरीराची घटना यामध्यें बरेंच साम्यहि आहे किम्बहुना, माकडास पुच्छ (सेंपुट) जास्त असल्यामुळें विशेपत्वाचा अधिकार त्यास पहोंचतो ह्मणुन त्यास महा मनुष्य ह्मणावें काय? नाहीं! त्यास कधीं ही मनुष्य ह्मणता येणार नाहीं

## पशुपेक्षा मनुष्याचें विशेषत्व

सर्व जन्माहून मनुष्यजन्माची परमोत्कृष्टता दुर्लभता दाखवून प्रशंसा केली त्याचें [illegible] विशेप कारण असावें? हीच [illegible] मूल कारण वरच्या श्लोकात [illegible] सांगितलें आहे, कीं “ धर्मो विशेपः [illegible] मनुष्याणां ”

अर्थात् मनुष्ययोनीवाचून इतर पशुपक्ष्याच्या योनीमध्यें धर्म करण्याची शक्ति नाहीं का कीं त्याच्यात स्पष्ट बोलण्याची योग्यता नाहीं आणि ज्ञानाच्या अभावामुळे त्याना धर्माधर्म पुण्यपापाची समज होत नाहीं, आणि मुख्यतया पराधीन असल्या कारणानें व जगात सत्सगतीच्या अभावानें ते फक्त आपले पोट भरण्याच्या उद्योगापेक्षा जास्त काहीं करू शकत नाहींत प्राप्त जन्म प्रपचातील दुष्कृत्यात घालवून आयुष्य समाप्त करितात ! आणि 'वासना तसें फळ' या योगानें जनन मरणाच्या फेऱ्यात सापडतात मनुष्याला वाचा शक्ति, स्वाधीनता, सत्सगतीचा योग सद्ज्ञान, श्रवण मनन करणें आणि त्याप्रमाणें वर्तणूक ठेवणें वगैरे प्राप्त झालें आहे ह्मणून इतर सर्व जन्मापेक्षा हीच अधिकता मनुष्य जन्मात आहे

---

# अधम मनुष्य पशुपेक्षाही हीन आहे.

अभंग

तरिच जन्मा यावें । दास ईश्वराचे व्हावें ॥१॥
नाहीं तरी काय थोडीं। श्वानसूकरें बापुडीं ॥२॥
जन्म आलियाचें फळ । अगीं न लागावा मळ ॥३॥
तुका ह्मणे तोची भला । ज्यानें देव ओळखीला ॥४॥

तुकारामबुवा

या नरजन्मात येऊन ईश्वराच्या आज्ञेचा (धर्माचा) स्वीकार केल्यानेंच या जन्माचें सार्थक्य होतें नाहीं तर त्याचा जन्म कुत्रीं व डुकरें याचेपेक्षाही वाईट आहे का कीं जाच्या अन्नाचें भक्षण करून प्राण रक्षण करीत असता तीं जशी स्वामिभक्ति बाजवितात तशीं स्वामीभक्ति मनुष्याचें अगात नाहीं खरोखरींच नाहीं, पहा ज्या धर्म-पुण्यकृपेनें आपणास सर्वोत्तम नरदेह सुखसम्पत्ति आणि संतति याचीं प्राप्ती झाली त्या

गातीं ऐकतीं हरीकीर्तन। ते समान विष्णुशीं ॥ २ ॥
अशुद्ध विटाळसीचे खल। बीडा भक्षिता तांबूल।
सापडेल सबळ। काळ हातीं ना सुटे ॥ ३ ॥
सेज बाज विलास भोग। करी कामिनीशीं संग।
तया जडे क्षय रोग। जन्म व्याधी वळीवत ॥ ४ ॥
आपण न जाय हरीकीर्तनीं। आणि कासी वारी कोणी
त्याचे पापे जाणी। हें गणा महा मेरू ॥ ५ ॥
तया दंडी यमदूत। झाले त्याचे अंकित।
तुका ह्मणे व्रत। एकादशीं चुकलिया ॥ ६ ॥

"न दान" नाव लौकिक मिळवण्याकरिता लग्न मृत्यु आदि प्रसंगात व आरामात शक्तिच्या पलीकडे द्रव्याचा व्यय करून आनन्द मानून घेतला असेल परन्तु ज्ञान किंवा धर्माच्या उन्नतिकरिता आणि अनाथ अपंग प्राण्यांना पोसण्याकरिता कधीं फुटक्या कवडीचाही व्यय (दान) केला नाहीं "न जाप" व्याधिग्रस्त (आजारी) झाल्यावर व संकटात पडल्यावर प्रभुचें

नामस्मरण [ जप ] केलें असेल, परन्तु सुखान असता त्याचें कधींही नाव आठवले नाहीं " न शील " दरिद्रता रोग आदि प्रसगीं ब्रह्म-चर्य पाळलें असेल, परन्तु द्रव्यानें युक्त आणि शरीरानें सुदृढ असून परस्त्री अथवा वेश्या गमन सोडलें नाहीं " न गुणो ' स्वार्थाकरितां अथवा बलिष्ठाच्या समोर गुणानुवाद गायले असतील, परन्तु नि स्वार्थ बुद्धिनें परमेश्वराचे व सत्पुरुषाचे गुणानुवाद गायले नाहींत " न धर्म· " अहिंसा सत्य निर्ममत्व -ध्यान मौन वगैरे पराधीनतेनें धा-रण केलें असेल परन्तु आत्महिताकरिता केलें नाहीं अशा मनुष्याचे जन्म ह्या पृथ्वीवर " खा-याला काळ आणि भूमिला भार " ह्या ह्मणी--प्रमाणें आहे ह्मणूनच भर्तृहरीनें त्याला मृगासा-रखें सागिलें आहे

## अधर्मी मनुष्य सर्वांहून नीच आहे.

मृग पशूचा पक्ष धारण करून एक विद्वान ह्मणाला:-

खरे शीर्षं जने मास । त्वच तु ब्रह्मचारिणो ॥
श्रृग योगीश्वर दद्यात । मृगस्त्रीपुविलोचने ॥१॥

अर्थ—मृगाना कस्तूरी उत्पन्न होते, ती अनेक गुणकारक आणि सुगन्धि असल्या कारणानें तिची सुवर्णाहूनहीं अधिक किम्मत असतें. कित्येक पापीलोक मृगास मारून मास भक्षण करितात त्वचा ( मृगाचें कातडें ) पवित्र मानून तपस्वीलोक आथरतात श्रृगाचा ध्वनि मगल मानून योगिजन दारोदारी फुकीत फिरतात आणि सुन्दरस्त्रीयाचे नेत्राना कुरगनयना किंवा मृगाक्षी अशी उपमा देतात, इत्यादि अनेक उपयोगात मृग येत आहे यास्तव मृगाची उपमा अधर्मी मनुष्याला देणें योग्य नाहीं

तेव्हा ज्ञानी म्हणाले— “ मनुष्यरूपेण गाश्चरति ’ अर्थात् अधर्मी मनुष्य गाई सारखा आहे तेव्हा गाईचा पक्ष धारण करून विद्वान म्हणाला—

तृणमत्ति दुग्ध धवल । छगण गेहमन्डन ॥
रोगापहारि मूत्र । पुच्छ सुरकोटिसस्थान ॥

अर्थ -जी गाय तृणासारख्या निर्माल्य वस्तुचें भक्षण करून दुग्धासारखा अत्युत्तम पदार्थ देते, आणि त्यापासून दही, लोणी, तूप, खवा वगैरे अनेक पदार्थ होतात शेणानें घर स्वच्छ होतें. गोमूत्रानें सर्व रोगाचा नाश होतो, आणि पुराणात लिहिलें आहे कीं गाईच्या शेपुटींत तेत्तीस कोटी देवाचें निवासस्थान आहे अशा उत्तम प्राण्याची त्या अधर्मी मनुष्यास उपमा देणें योग्य नाहीं

तेव्हा ज्ञानी ह्मणाले 'मनुष्यरुपेण भवति वृक्षा.' अर्थात अधर्मी वृक्ष झाडासारखा आहे. तेव्हा झाडाचा पक्ष धारण करून विद्वान ह्मणाला

छाया कुर्यामह लोके । फल पुष्प ददाम्यह ॥
पक्षिणा सर्वदाधारो । गृहद्वार वहे तव ॥१॥

अर्थात्- वृक्ष -उन्हानें घाबरलेल्या लोकानर

सावली करितो, पुष्प-फळानें सर्व जगास सतुष्ट करितो आणि पक्ष्याना तर तो सर्व प्रकारें आधारभूतच आहे अशा गुणाढ्य पदार्थांची उपमा अधर्मी मनुष्यास देणें योग्य नाहीं

तेव्हा ज्ञानी ह्मणाले-- " मनुष्यरूपेण धूलेश्च पुजः " *अर्थात्-तो अधर्मी मनुष्य धूळ माती* सारखा आहे तेव्हा धूळीचा पक्ष धारण करून विद्वान ह्मणाला

कारयामि शिशुक्रीडा । पकाना शर्करे मिव ॥
मतो जनो नीरजपर्वो । लेखे क्षिप्त फलप्रद ॥१॥

अर्थात्- मातीमध्यें लहान मुलें खेळत असता त्याचे मनोरंजन होतें घर वगैरे बाधण्याचे कामीं चिखलाकरिता मातीची आवश्यकता असते शिमग्याच्या सणाचे दिवशीं मोठाली स्त्री पुरुष माणसें हौसेनें धूलिका डोक्यावर टाकतात विद्वानलोक कागद लिहून शाई शोषण होण्याकरिता त्यावर मृत्तिका टाकतात व तें शुभ सम-

जतात, अशा उत्तम पदार्थाची उपमा त्या अधर्मी मनुष्याला देणें योग्य नाहीं

अशा उदाहरणानीं अधर्मी मनुष्याची हीनता दाखविली आहे साराश हा आहे कीं, अधर्मी मनुष्याला उपमा देण्यासारखी नाचि वस्तु या सृष्टीवर एकही नाही

अभग

एका गाढव मनुष्याचा वेश ।
हालवितो पुम पुढें दाढी ॥ १ ॥
निन्दा हे भोजन जेवण तयासीं ।
जोडी घरी राशी पातकाची ॥ २ ॥
तुका ह्मणे सुखें वैसानिया स्वाती ।
कुंभीपाक होती नर्कवासी ॥ ३ ॥

अहो भव्य लोकानो ! ज्या मनुष्यदेहाक रिता स्वर्गांतील देव नेहमीं प्रार्थना करितात ज्या देहात मोठमोठाले अवतारिक पुरुष होऊन सुरेन्द्रास पूज्य झाले आणि ज्या देहानें ससाराचा

अन्त होऊन मोक्षाची प्राप्ति होते, अशा उत्तम नरदेहाला वर दाखविल्याप्रमाणें नीच उपमा देणें हें फारच अधमपणाचें काम आहे; ह्मणून आपण आपलेच हितेच्छु बनून अन्त:करणात विचार केला पाहिजे, कीं अशा परमोत्तम देहाला ससाराच्या दुष्ट कामात निरर्थक न दवडिता ज्या कार्याकरिता हा देह आपणास मिळाला आहे तें कार्य करून घेणें हेंच सत्पुरुषाचें लक्षण आहे

## मनुष्यजन्माचे कर्तव्य

" धर्मो विशेष, खलु मानुषाणा " अर्थात् चौऱ्याऐंशी लक्ष योनिमध्यें फक्त नरदेहाच्या ठिकाणींच धर्म करण्याची शक्ति आहे, ह्मणून ' धर्म धारण करणें ' हेंच मनुष्याचे कर्तव्य आहे

## धर्माचें महत्व

धर्माला एवढें मोठें महत्व देण्याचें काय कारण आहे ? येथें हा प्रश्न स्वाभाविक उत्पन्न

होतो याचा खुलासा एका ग्रन्थात असा केला आहे

धर्मोऽयं धनवल्लभेषु धनदः कामार्थिनां कामदः ।
सौभाग्यार्थिषु तत्प्रदः किमपरं पुत्रार्थिनां पुत्रदः ॥
राज्यार्थिष्वपि राज्यदः किमथवा नानाविकल्पैर्नृणां ।
तत्किं यन्न ददाति वाञ्छितफलं स्वर्गापवर्गावधि ॥१॥

अर्थात्–धर्म हा धन इच्छणारास धन देतो, कामार्थी मनुष्याची कामना पूर्ण करितो, सौभाग्य इच्छिणारास सौभाग्य देतो, निपुत्रकास पुत्र देतो, राज्याभिलाषीस राज्य देतो किं बहुना, स्वर्ग आणि मोक्ष धर्मानेंच मिळतो तर जगामध्यें अशा कोणता पदार्थ आहे कीं जो धर्मानें प्राप्त होत नाहीं ? अर्थात् सर्व काही धर्मानें प्राप्त होतें यास्तव धर्म सर्वांहून श्रेष्ठ आहे जगातील सर्व प्राण्याना सुखाची इच्छा असते तें इच्छित सुख देणारा धर्मच आहे, यास्तव धर्म करण्याची इच्छा सर्वांना होईल यात काय आश्चर्य ! किन्तु असा धर्म कोणता

आहे कीं ज्यानें इच्छित कार्य सिद्ध होतें ? का कीं या कलियुगात धर्माचे अनेक मतभेद झाले आहेत सर्व धर्मांचे मूल एकच असता वेग वेगळ्या प्रकारानें बोध करतात, सर्वांहून आमचा धर्म श्रेष्ट आहे, असें म्हणतात, असें ऐकून स्वल्प बुद्धिचे मनुष्य घोटाळ्यात पडतात कीं, आता कोणता धर्म स्वीकारावा ? ह्या घोटाळ्याचा निकाल शास्त्राधारानें करणें येथें उचित आहे

## धर्माचे साधन

अहिंसा सत्यमस्तेयं । शौचमिन्द्रियनिग्रह ॥
दान दया दम क्षान्ति । सर्वेषां धर्मसाधनम् ॥

( याज्ञवल्क्यस्मृति )

अर्थात्–१ " अहिंसा ' जगातल्या सर्व चराचर ( त्रसस्थावर ) प्राण्याचा कोणतेही प्रकारें वध-घात न करणें २ " सत्य '- कर्णादि इन्द्रियानीं ग्रहण केलेले विषय मनात ज्या त्या प्रकारें

[ कोणालाही दु.ख न होईल अशा ] वृत्तीनें ग्रहण करून शरीराचा निर्वाह करितात ।-

जैसें होशी लोक आपल्या आरामाकरिता फुलाचीं झाडें लावितात, तेथें अवचित भ्रमर येऊन फुलास अल्पहि दुःख न देता आपल्या आत्म्याला तृप्त करितो त्या प्रमाणें गृहस्थानीं आपल्या शरीराच्या व कुटुंबाच्या सरक्षणाकरीता केलेल्या स्थान वस्त्र व आहारातून भ्रमराप्रमाणें त्याना त्रास न होईल अशा प्रकारें त्यातला कांहीं भाग घेऊन आपल्या शरीराचें पोषण करितात आणि ज्ञान ध्यान तप सयमानें स्व आत्म्याचा व सद्बोधानें पर आत्म्याचा उद्धार करितात तेच साधु होत

— ४ —

## गृहस्थ धर्म

साधु वृत्तिनें गृहस्थाश्रमाचा निर्वाह होणें फार कठिण आहे का कीं गृहस्थाना माती पाणी वि-

स्तत्र आणि वनस्पति याचा उपयोग सदोदित करण्याचा प्रसग पडतो यास्तव वर सागितलेल्या सहा प्रकारच्या प्राण्यामध्यें शेवटीं जो चलन वलन करणाऱ्या प्राण्याचा प्रकार सागितला त्याचा तर वध कधीही करू नये का कीं त्याचा वध न केला तरी ससारात कोणत्याही प्रकाराची नड पडत नाहीं यास्तव त्रस जीव प्राण्याचा वध करण्याचें शास्त्रात महापातक सागितलें आहे

---

## हिंसकास दड.

यावन्ति पशुरोमाणि । पशुघातिषु भारत ॥
तावद्वर्षसहस्राणि । पच्यन्ते नरके नरा ॥११॥

महा-भारत, अनुशासनपर्व

अर्थात्—ज्या पशुचा वध केला असेल त्याच्या शरीरावर जितके रोम ( केस ) असतील तितकीं हजार वर्षेपर्यंत त्यास नरकाची शिक्षा भोगावी लागेल

स्वल्पायुर्विकलो रोगी । विचक्षर्वधिरः खलु ॥
वामन पामन पढो । जायते स भवे भवे ॥

अर्थान्--हिंसा करणारा पुढें जन्मोंजन्मीं स्वल्पायु अगहीन व्याधिगृस्त अन्ध वधिर वामन [ ठेंगणा ] आणि कुष्टादि अनेक रोगानीं पीडित दुःखी नपुसक होत असतो एका जन्मात केलेलीं हिंसा जन्मोजन्मीं ह्या प्रमाणें दुःख देणारी होते. हें भक्म लक्षात ठेवावे

## अभग.

धिक तो दुर्जन नाहीं भूतदया,
व्यर्थ तया माया, प्रसवली ॥ १ ॥
कठीण हृदय तया चाडाळाचें,
जो नेणें पराचें । दुःख काहीं ॥ २ ॥
जसे आपले प्राण, तैंसे सकल लोक,
न काहीं विवेक, पशु जैसा ॥ ३ ॥
तुका ह्मणे सुखें, कापीतसे गळा,

आपली ती थेरा, ... ॥ ४ ॥

तुकाराम बुवा

—०•०—

## क्षुद्र प्राण्याचें रक्षण.

कित्येक अधर्मी लोक म्हणतात की उं-दीर, विंचू, साप वगैरे क्षुद्र ( दुःख देणारे ) प्राण्याचा वध करण्याविषयीं देवाची आज्ञा आहे, आणि तेच लोक पुन्हा म्हणतात की देवानें सृष्टी उत्पन्न केली आहे. आतां विचार करा- १ आपण एखादी वस्तु तैयार केली त्यास दुसरा कोणी वाईट म्हणाला, किंवा त्या वस्तुचा कोणी विध्वंस केला तर आपणा-स राग येतो की नाहीं ? होय, येतो का की, त्यानें त्याचा अपमान केला व मेहनत फुकट गमावली. त्याच प्रमाण देवाचे परिश्रमास अ-

नुपकारी मानून व्यर्थ दवडितो त्या मनुष्यास किती अधम म्हणावें ? २ जे प्राणी तुह्मास दु ख देतात त्याना तुह्मी क्षुद्र म्हणून मारिता, परतु तुम्ही त्याना क्षुद्र ह्मणून त्याच्यापेक्षा ज्यास्त ह्मणजे महाक्षुद्र झाला कीं नाहीं मग तुह्माला तरी पुढें कोण सोडणार ? ३ मनुष्याचे शरीरसंबधानें जशी मुलाची उत्पत्ती होते, तशी अगाबर वस्त्र राहिले तर यूका ( ऊवा ) पडतात घरात मनुष्य राहिले तर ढेंकूण होतात, मग पुत्राचें पालण करणें आणि तत्संबधी प्राण्यास मारून टाकणें हा किती अन्याय आहे ! ४ जरी मुलगा कितीही वाइट असला तरी पण बाप त्याचा गळा कापित नाहीं- फारच झालें तर त्यास घराबाहिर काढतो त्या प्रमाणें जर या क्षुद्र प्राण्यापासून होणारें दु.ख तुह्मास सहन होत नसेल, तर त्यास बाहिर काढून सुखस्थानीं टाकलें तर ते काहीं पक्षी नाहींत कीं पुन्हा तुमच्या घरात

उडून येतील ५ अधर्मी लोक सापाला क्षुद्र प्राणी ह्मणतात आणि तेच त्याला देव समझतात त्यानें सत्पुरुषाला ( श्रीविष्णूला ) आपली काया शय्या करिता अर्पण केली, आणि शकरानीं त्याला मायारूप मानून आपल्या गळ्यात धारण केलें. याच करिता दर नागपचमीस त्याची पूजा करून त्यास दुग्धपान करवितात खरा साप मिळाला नाहीं तर चित्र काढून त्याची पूजा करितात अशा पूज्य प्राण्याला क्षुद्र मानून त्याचा वध करणें हें किती अधमपणाचें काम आहे ? याचा विचार करा ६ आपणास कोणी शिवी दिली, किंवा अपमान केला तर आपणही उलट त्यास तसेंच करितो तसेंच साप अगर विंचु त्याना आपण धक्का लाविला तर ते आपणास दस करितात का कीं त्याच्या जवळ उपाय तोच आहे मनुष्य ज्ञानी असूनही क्षमा करू सकत नाहीं मग तो तर अज्ञानी प्राणी आहे, तो क्षमा

कशी करू शकेल? आणि पहिल्यानें आपण धक्का लागिला ह्मणून त्यानें दंस केला, यावरून पहिल्यानें आपण गुन्हेगार झालो गुन्हाबद्दल त्यानें शिक्षा केली, मग त्याला मारणें किती अनीतीचें काम आहे" कित्येकाच्या अंगावरून साप, विंचू निघून जातात परन्तु ते त्याना धक्का न लाविल्यामुळें तेही मनुष्याला चावत नाहींत जरा नीतीनें वागा! एवढें विचारणारा आहे! भीति बाळगा! जर आपला मृत्यु आणि दु:ख साचें सरचाचेच होणार असेल तर त्याचा घात केल्यानें तें चुकेल काय? कदापि नाही, हे निश्चयाने समजा ज्यावेळा जें दु:ख किंवा सुख भोगण्याचें असेल तें त्या वेळीं भोगावेंच लागेल मग त्याचा वध करून दोषी का व्हावें" ८ कुंभारानें मातीचें गाडगें तयार केलें आणि कोणी त्यास फोडून टाकिलें तर तो आपल्या मेहनतीचा मोबदला घेतल्याशिवाय सोडीत नाहीं, तर ईश्वराला त्या प्राण्याचा

कर्ता म्हणता आणि त्या प्राण्याचा घात तुम्ही करता, मग ईश्वर तुम्हाला शिक्षा दिल्याशिवाय कसें सोडणार ? याचा विचार करा.

ह्या वरच्या ८ उदाहरणावरून समजा कीं १ क्षुद्र प्राण्याचा वध करण्याविषयीं ईश्वराचा हुकूम नाहीं, २ ● धर्मही नाहीं, ३ अनीति व पाप आहे, ४ काहीं फायदाही नाहीं, ५ आणि त्याच्या वधाबद्दल गुनास खुन धावा लागेल असा नक्की विचार करून धर्मेच्छु मनुष्यानीं "कोणत्याही प्राण्याचा वध मी करणार नाहीं अशी शपथ घ्यावी

*—*—*

## जीवदयेचे महत्त्व

एकतः काञ्चनो मेरुः । बहुरत्ना वसुंधरार ॥

---

●पहा श्रीमद्भागवत ७ वा स्कन्ध १४ या अध्याय ९ वा श्लोक, २३ व्या मागे पृष्टात दिला ते.

एकतो भयभीतस्य। प्राणिन प्राणरक्षण ॥

अर्थात्–सुवर्णाचा मेरु पर्वत आणि सर्व पृथिवी भरून रत्नाचा दान करण्यापेक्षाही एकच जीवाचें रक्षण करणें अधिक आहे ? पहा! दानापेक्षाही अहिंसा–दयेचें केवढें मोठें महत्व आहे

---

## मास–आहारी लोकाच्या पृश्नाचे समाधान

कित्येक मास–आहारी लोक म्हणतात कीं बकरीं कोंबडीं वगैरे प्राणी ईश्वरानें आ-मचे भक्षणाकरिता उत्पन्न केले आहेत, आणि लिहिले आहे कीं, " जीवो जीवस्य जीवनम् " म्हणजे जीवाचा जीव भक्ष आहे असें म्हणणें ही अज्ञानाचें आहे का कीं—प्रथम तर ईश्वरानें कोणासही उत्पन्न केलें नाहीं, विचार करा

( अ ) न्यूनते शिवाय इच्छा होत नाहीं [ आ ] इच्छे वाचून कोणी काहीं करित नाहीं ( इ ) इच्छा करणें तेंच दु.ख आहे [ ई ] कार्य करणें तें कर्म आहे ( उ ] कर्माचें फळ अ-वश्य भोगावे लागतें म्हणून ईश्वरास हे दुर्गुण लागू होत नाहींत, का रीं [ अ ] ईश्वराला न्यूनता नाहीं, [ आ ] म्हणून, कोणतेंही कार्य करण्याची इच्छा त्यास होत नाहीं, [ इ ] वास्तव तो परमानन्दी परम सुखी आहे ( ई ) कर्महीं करित नाहीं ( उ ) आणि कर्माच्या अभावामूळें तो पुन' ससारात जन्मधारण करित नाहीं तोच खरा ईश्वर होय प्राणी जसें कर्म करितात, तशा योनींत ते जन्म घेतात काणाच्या भक्षणाकरिता कोणी उत्पन्न झाले नाहींत

२ नरें जसे ईश्वरानें तुमच्या भक्ष्याकरिता ब-करें कोंबडीं वगैरे उत्पन्न केलीं आहेत तसेंच तुमचें भक्षण करण्याकरता सिंह व्याघ्र इत्या

दि प्राणी उत्पन्न केले आहेत त्याना मनुष्य-मासाची फार गोडी असते म्हणून जेव्हा तुह्मास खाण्याकरिता ते येतात तेव्हा त्याना पाहून तुह्मी ओरडून का पळता ? जसा तुमचा देह तुह्माला प्रिय आहे तसा सर्व प्राण्याना आपापला देह प्रिय आहे

यथात्मन' प्रिय प्राणस्तथान्यस्यापि देहिन. ॥
इति मत्वा न कर्तव्यो । घोरः प्राणिवधो बुधैः ॥

विष्णुपुराण

अर्थात्—जसा आपला प्राण आपणास प्रिय आहे, त्याच प्रमाणें सर्व प्राण्याना आपापले प्राण प्रिय आहेत असे जाणून कोणत्याही प्राण्याचा वध करणें दुःख दायक आहे यास्तव बुद्धिमान लोकानीं प्राणीवध करू नये ३ "जीवो जीवस्य जीवनम्' असें जें लिहिलें आहे, तें खरें आहे परतु त्याचा खरा अर्थ सम-

जला ❀ पाहिजे "जीवो जीवस्य जीवनम्"

अर्थात्-जीव जीवाचें जीवन आहे, ह्मणजे एका जीवाला दुसऱ्या जीवाचे साहाय्यामुळें त्याचा निर्वाह होत असतो जसें मनुष्याला ज्ञान आहे तो पशुचें पालन करितो अर्थात्-

---

❀ अभंग

पर्जन्य पडावे आपुल्या स्वभावें ।
आपुल्याला देवे पिके भूमी ॥ १ ॥
बीज तसे फळ, येईल शेवटीं ।
लाभ हानी तुटी ज्याची तया ॥ २ ॥
दीपाचिया अगीं नाहीं दूजा भाव ।
धनी चोर साव, सारखेंची ॥ ३ ॥
काऊळ ढोपरा कंक तितीरा ।
राजहस चारा, मुक्ताफळ ॥ ४ ॥
तुका ह्मणे येथें आवडी कारण ।
पिकला नारायण, जया तैसा ॥ ५ ॥

राहण्यास जागा, खाण्यास दाणा चारा व पिण्यास पाणी देतो आता कित्येक कामे अशीं आहेत कीं मनुष्यास पशुच्या महायाशिवाय चालत नाहीं उदाहरणार्थ—शेतामध्यें नागर ओढिनात, विहिरींतून मोटानीं पाणी काढीतात, वस्त्राकरिता लोकर देतात दुध, दही, खवा, लोणी, ताक वगैरे पशूपासून मिळतात त्याच्या शेणानें घर स्वच्छ होतें डोंगरासारख्या दुर्गम स्थानीं पशुवरून माल पोचविता येतो इत्यादि अनेक कामात पशुपासून मनुष्य साहाय घेतो. यावरून ह्मटलें आहे कीं " जीवो जीवस्य जीवनम् " जर जीवाचा जीव भक्षण असते तर लिहिलें असतें कीं " जीवो जीवस्य भोजनम् ' परन्तु असें लीहीले नसतानाही अर्थाचा अनर्थ करून वाईट लोक भोळ्या लोकास बुडवितात अत'करणात दीर्घ दृष्टीनें जरा विचार करून पहा ४ मास भक्षण हें मनुष्याचें भक्ष्य

नाहीं जी जनावरें मास भक्षण करितात त्याच्या शरीराचे अवयवही वेगळ्या प्रकाराचे असतात. ते शस्त्रादिकाच्या साहायावाचूनही प्राण्याचा विध्वस करून कचे मास भक्षण करितात आणि त्याना तें पचन होतें मनुष्याचे अवयव तसे नाहींत मनुष्यास शस्त्राशिवाय व अग्निसस्कारा शिवाय तें पचत नाहीं तसेंच अग्नि वर शिजविल्यानतर सुद्धा मास भक्षण केले तरी पण त्यापासून अनेक रोग होतात असें विद्वान इग्रेजी डाक्टराचे ह्मणणें आहे — STARCH-SUGAR (स्टार्च शुगर) नावाचा पदार्थ मासात नसल्यामुळें SCUPVY (रक्तपिती) चा रोग उत्पन्न होतो, आणि मास भक्षण केल्यानें "मिट्फिवर" एक प्रकाराचा ताप येतो यावरून असें सिद्ध होतें कीं मनुष्य माम–आहारी नाहीं ५ कित्येक लोक असें ह्मणतात कीं आह्मी आयते मास विकत घेतो आणि

खातो, परतु ह्यातानें हिंसा करित नाहीं, म्हणून आह्मास पाप लागत नाहीं हेंही त्याचे म्हणणें नीतिविरुद्ध आहे, का कीं मनुस्मृतींत पाचव्या अध्यायाच्या तिसऱ्या भागामध्यें ८ जणास घातक म्हटलें आहे —

अनुमन्ता विशसिता। निहन्ता क्रयविक्रयी॥
सस्कर्ता चोपहर्ताच। खादकाश्चेति घातका:॥

अर्थात्-१ प्राण्याला मारण्याची आज्ञा देणारा २ शस्त्र देणारा, ३ मारणारा, ४ घेणारा, ५ देणारा, ६ शिजविणारा, ७ वाढणारा आणि ८ खाणारा ही मनुष्यें घातकाचीं अधिकारी आहेत आता पहा तुमची सुटका कशी होईल ती ६ ह्याच मनुस्मृतींत मासाचा अर्थ असा केला आहे कीं–मा=माझे×स=साग्खे अर्थात जसे माझे हाल त् करित आहे (भाक्षित आहेस) त्याचप्रमाणें मी तुझे हाल करणार भक्षणार! अहो मास भक्षण करणाऱ्या हिन्दूनों! आपल्या घरात मनुष्याचा

मृत्यु झाल्यानन्तर त्याला स्मशानात नेऊन जाळिता, अघोळ केल्यावाचून घरातही येत नाहींत, आणि त्याचे बारा दिवसापर्यंत सूतक पाळिता ? मग बकरा वगैरे प्राण्यास घराचें आग णात ठार मारून त्याचा मास घरात चुलीवर शिजवून तें खाता याचें सूतक किती दिवसाचें. विष्टाला पाहून तुह्मी थू. थू. करिता रक्ताचा थेंब अंगास लागला असता धुऊन टाकिता, तर विष्टा रक्तानें भरलेला मासाचा टुकडा खाताना तुह्माला कशी घाण येत नाहीं "

—:*:—

## यज्ञांतही जीवाचा वध करू नये

कित्येक लोक ह्मणतात कीं यज्ञाचें मास किंवा मन्त्रानें पवित्र केलेलें मास पवित्र असतें हें त्याचें ह्मणणें राक्षसासारखें आहे

[ कोणालाही दु:ख न होईल अशा ] वृत्तीनें ग्रहण करून शरीराचा निर्वाह करितात

जैसें होशी लोक आपल्या आरामाकरिता फुलाचीं झाडें लावितात, तेथें अवचित भ्रमर येऊन फुलास अल्पहि दुःख न देता आपल्या आत्म्याला तृप्त करितो त्या प्रमाणें गृहस्थानीं आपल्या शरीराच्या व कुटुंबाच्या संरक्षणाकरीता केलेल्या स्थान वस्त्र व आहारातून भ्रमराप्रमाणें त्यांना त्रास न होईल अशा प्रकारें त्यातला काहीं भाग घेऊन आपल्या शरीराचें पोषण करितात आणि ज्ञान ध्यान तप संयमानें स्व आत्म्याचा व सद्बोधानें पर आत्म्याचा उद्धार करितात तेच साधु होत

— ※ —

## गृहस्थ धर्म

साधु वृत्तिनें गृहस्थाश्रमाचा निर्वाह होणें फार कठिण आहे का कीं गृहस्थाना माती पाणी वि-

स्तव आणि वनस्पति याचा उपयोग सदोदित करण्याचा प्रसग पडतो यास्तव वर सागितलेल्या सहा प्रकारच्या प्राण्यामध्यें शेवटीं जो चलन वलन करणाऱ्या प्राण्याचा प्रकार सागितला त्याचा तर वध कधीही करू नये. का कीं त्याचा वध न केला तरी ससारात कोणत्याही प्रकाराची नड पडत नाहीं. यास्तव त्रस जीव प्राण्याचा वध करण्याचें शास्त्रात महापातक सागितलें आहे

---

## हिंसकास दंड.

यावन्ति पशुरोमाणि । पशुघातिषु भारत ॥
तावद्वर्षसहस्राणि । पच्यन्ते नरके नरा ॥११॥

महा-भारत, आनुशासनपर्व

अर्थात्—ज्या पशुचा वध केला असेल त्याच्या शरीरावर जितके रोम ( केस ) असतील तितकीं हजार वर्षेपर्यंत त्यास नरकाची शिक्षा भोगावी लागेल

स्वल्पायुर्विकलो रोगी । विचक्षुर्बधिरः खलु ॥
वामन पामन. पढो । जायते स भवे भवे ॥

अर्थात्–हिंसा करणारा पुढें जन्मोंजन्मीं स्वल्पायु अगहीन व्याधिग्रस्त अन्ध बधिर वामन [ ठेंगणा ] आणि कुष्टादि अनेक रोगानीं पीडित दुःखी नपुसक होत असतो एका जन्मात केलेली हिंसा जन्मोजन्मीं ह्या प्रमाणें दुःख देणारी होते. हें मक्कम लक्षात ठेवावे

## अभग.

धिक तो दुर्जन नाहीं भूतदया,
व्यर्थ तया माया, प्रसवली ॥ १ ॥
कठीण हृदय तया चाडाळाचें,
जो नेणें पराचें । दुःख काहीं ॥ २ ॥
जसे आपले प्राण, तसे मक्र लोक,
न काहीं विवेक, पशु जैसा ॥ ३ ॥
तुका ह्मणे सुखें, कापतिसे गळा,

आपली ती वेळा, रडतसे ॥ ४ ॥

तुकाराम बुवा

—*०*—

## क्षुद्र प्राण्याचें रक्षण

कित्येक अधर्मी लोक म्हणतात कीं ऊ, ढेंकून, विंचू, साप वगैरे क्षुद्र (दु:ख देणारे) प्राण्याचा वध करण्याविषयीं देवाची आज्ञा आहे, आणि तेच लोक पुन्हा म्हणतात कीं देवानें सृष्टी उत्पन्न केली आहे आता विचार करा- १ आपण एखादी वस्तु तैयार केली त्यास दुसरा कोणी वाईट म्हणाला, किंवा त्या वस्तुचा कोणी विध्वंस केला तर आपणास राग येतो कीं नाहीं ? होय, येतो का कीं, त्यानें त्याचा अपमान केला व मेहनत फुकट गमावली त्याच प्रमाणें देवाचे परिश्रमास अ-

नुपकारी मानून व्यर्थ टवडितो त्या मनुष्यास किती अधम म्हणावें ? २ जे प्राणी तुह्मास दुःख देतात त्याना तुह्मी क्षुद्र म्हणून मारिता, परंतु तुम्ही त्याना क्षुद्र ह्मणून त्याच्यापेक्षा ज्यास्त ह्मणजे महाक्षुद्र झाला कीं नाहीं मग तुह्माला तरी पुढें कोण सोडणार ? ३ मनुष्याचे शरीरसबधानें जशी मुलाची उत्पत्ती होते, तशी अगावर वस्त्र राहिले तर यूका ( लवा ) पडतात घरात मनुष्य राहिले तर ढेंकूण होतात, मग पुत्राचें पालण करणें आणि तत्सबधी प्राण्यास मारून टाकणें हा किती अन्याय आहे ! ४ जरी मुलगा किती वाइट असला तरी पण बाप त्याचा गळा कापित नाहीं- फारच झालें तर त्यास घराबाहिर काढतो त्या प्रमाणें जर या क्षुद्र प्राण्यापासून होणारें दुःख तुह्मास सहन होत नसेल, तर त्यास बाहिर काढून सुखस्थानीं टाकलें तर ते काहीं पक्षी नाहींत कीं पुन्हा तुमच्या घरांत

उडून येतील ५ अधर्मी लोक सापाला क्षुद्र प्राणी
ह्मणतात आणि तेच त्याला देव समझतात त्यानें
सत्पुरुषाला ( श्रीविष्णूला ) आपली काया शय्या-
करिता अर्पण केली, आणि शकरानीं त्याला
मायारूप मानून आपल्या गळ्यात धारण केलें.
याच करिता दर नागपचमीस त्याची पूजा करून
त्यास दुग्धपान करवितात खरा साप मिळाला
नाहीं तर चित्र काढून त्याची पूजा करितात
अशा पूज्य प्राण्याला क्षुद्र मानून त्याचा वध करणें
हें किती ८ धमपणाचें काम आहे ? याचा
विचार करा ६ आपणास कोणी शिवी दिली,
किंवा अपमान केला तर आपणही उल्ट
त्यास तसेंच करितो तसेंच साप अगर विंचु
त्याना आपण धक्का लाविला तर ते आपणास
दस करितात का कीं त्याच्या जवळ उपाय तोच
आहे मनुष्य ज्ञानी असूनही क्षमा करू सकत
नाहीं मग तो तर अज्ञानी प्राणी आहे, तो क्षमा

कशी करू शकेल? आणि पहिल्यानें आपण धक्का लाविला ह्मणून त्यानें दंस केला, यावरून पहिल्यानें आपण गुन्हेगार झालो गुन्हाबद्दल त्यानें शिक्षा केली, मग त्याला मारणें किती अनीतीचें काम आहे? कित्येकांच्या अंगावरून साप, विंचू निघून जातात परन्तु ते त्यांना धक्का न लावित्यामुळें तेही मनुष्याला चावत नाहींत जरा नीतीनें वागा! पुढे विचारणारा आहे! भीति बाळगा! जर आपला मृत्यु आणि दुःख याचे सबधानेंच होणार असेल तर त्याचा घात केल्यानें तें चुकेल काय? कदापि नाहीं, हे निश्चयाने समजा ज्यावेळीं जें दुःख किंवा सुख भोगण्याचें असेल तें त्या वेळीं भोगावेंच लागेल मग त्याचा वध करून दोषी का व्हावें? ८ कुंभारानें मातीचें गाडगें तयार केलें आणि कोणी त्यास फोडून टाकिलें तर तो आपल्या मेहनतीचा मोबदला घेतल्याशिवाय सोडीत नाहीं, तर ईश्वराला त्या प्राण्याचा

कर्ता म्हणता आणि त्या प्राण्याचा घात तुम्ही करता, मग ईश्वर तुम्हाला शिक्षा दिल्याशिवाय कसें सोडणार ? याचा विचार करा

ह्या वरच्या ८ उदाहरणावरून समजा कीं १ क्षुद्र प्राण्याचा वध करण्याविषयीं ईश्वराचा हुकूम नाहीं, २ * धर्मही नाहीं,३ अनीति व पाप आहे, ४ कांहीं फायदाही नाहीं, ५ आणि त्याच्या वधाबद्दल खुनास खुन द्यावा लागेल असा नक्की विचार करून धर्मेच्छु मनुष्यानीं "कोणत्याही प्राण्याचा वध मीं करणार नाहीं अशी शपथ घ्यावी

*—*—*

## जीवदयेचे महत्त्व

एकतः काञ्चनो मेरुः । बहुरत्ना वसुंधरार ।।

---

* पहा श्रीमद्भागवता ७ वा स्कन्ध १४ वा अध्याय ९ वा श्लोक, २३ व्या मागे पृष्ठात दिला ते

एकतो भयभीतस्य । प्राणिन प्राणरक्षण ॥
अर्थात्–सुवर्णाचा मेरु पर्वत आणि सर्व पृथिवी भरून रत्नाचा दान करण्यापेक्षाही एकच जीवाचें रक्षण करणें अधिक आहे ? पहा ! दानापेक्षाही अहिंसा–दयेचें केवढें मोठें महत्व आहे

## मांस–आहारी लोकाच्या पृश्नाच समाधान

कित्येक मास–आहारी लोक म्हणतात कीं बकरीं कोंबडीं वगैरे प्राणी ईश्वरानें आमचे भक्षणाकरिता उत्पन्न केले आहेत, आणि लिहिले आहे कीं, " जीवो जीवस्य जीवनम् " म्हणजे जीवाचा जीव भक्ष आहे असें म्हणणें ही अज्ञानाचें आहे का कीं—प्रथम तर ईश्वरानें कोणासही उत्पन्न केलें नाहीं, विचार करा

( अ ) न्यूनते शिवाय इच्छा होत नाहीं [ आ ] इच्छे वाचून कोणी काहीं करित नाहीं ( इ ) इच्छा करणें तेंच दु.ख आहे [ ई ] कार्य करणें तें कर्म आहे ( उ ] कर्माचें फळ अवश्य भोगावें लागतें म्हणून ईश्वराम हे दुर्गुण लागू होत नाहींत, का णीं [ अ ] ईश्वराला न्यूनता नाहीं, [ आ ] म्हणून १ कोणतेंही कार्य करण्याची इच्छा त्यास होत नाहीं, [ इ ] यास्तव तो परमानन्दी परम सुखी आहे ( ई ) कर्महीं करित नाहीं ( उ ) आणि कर्माच्या अभावामूळें तो पुन. ससारात जन्मधारण करित नाहीं तोच खरा ईश्वर होय प्राणी जसें कर्म करितात, तशा योनींत ते जन्म घेतात कोणाच्या भक्षणाकरिता कोणी उत्पन्न झाले नाहींत २ वरें जसें ईश्वरानें तुमच्या भक्ष्याकरिता बकरें कोंबडीं वगैरे उत्पन्न केलीं आहेत तसेंच तुमचें भक्षण करण्याकरता सिंह व्याघ्र इत्या-

दि प्राणी उत्पन्न केले आहेत त्याना मनुष्य-मासाची फार गोडी असते म्हणून जेव्हा तुह्मास खाण्याकरिता ते येतात तेव्हा त्याना पाहून तुह्मी ओरडून का पळता ? जसा तुमचा देह तुह्माला प्रिय आहे तसा सर्व प्राण्याना आपापला देह प्रिय आहे

यथात्मनः प्रिय प्राणस्तथान्यस्यापि देहिन. ॥
इति मत्वा न कर्तव्यो । घोरः प्राणिवधो बुधैः ॥

विष्णुपुराण

अर्थात्—जसा आपला प्राण आपणास प्रिय आहे, त्याच प्रमाणें सर्व प्राण्याना आपापले प्राण प्रिय आहेत असें जाणून कोणत्याही प्राण्याचा वध करणें दु.ख दायक आहे, यास्तव बुद्धिमान लोकानीं प्राणीवध करु नये ३ "जीवो जीवस्य जीवनम्" असें जें लिहिले आहे, तें खरें आहे परंतु त्याचा खरा अर्थ सम-

जला ❀ पाहिजे "जीवो जीवस्य जीवनम्"
अर्थात्-जीव जीवाचें जीवन आहे, ह्मणजे एका जीवाला दुसऱ्या जीवाचे साहाय्यामुळें त्याचा निर्वाह होत असतो. जसें मनुष्याला ज्ञान आहे तो पशुचें पालन करितो अर्थात्-

---

❀ अभंग

पर्जन्य पडावे आपल्या स्वभावें ।
आपुल्याला दैवें पिके भूमी ॥ १ ॥
बीज तसें फळ, येईल शेवटी ।
लाभ हानी तुटी ज्याची तया ॥ २ ॥
दीपाचिया अंगीं नाहीं दुजा भाव ।
धनी चोर साव, सारखेंची ॥ ३ ॥
काऊळ ढोपरा करू तिनीरा ।
राजहंस चारा, मुक्ताफळ ॥ ४ ॥
तुका ह्मणे येथें आवडी कारण ।
पिकला नारायण, जया तैसा ॥ ५ ॥

राहण्यास जागा, खाण्यास दाणा चारा व पि ण्यास पाणी देतो आता कित्येक कामें अशीं आहेत कीं मनुष्यास पशुच्या सहायाशिवाय चालत नाहीं उदाहरणार्थ—शेतामध्यें नागर ओ-ढितात, विहिरींतून मोटानीं पाणी काढीतात, वस्त्राकरिता लोकर देतात दुध, दही, खवा, लोणी, ताक वगैरे पशूपासून मिळतात. त्याच्या शेणानें घर स्वच्छ होतें. डोंगरासारख्या दुर्गम स्थानीं पशुवरून माल पोचविता येतो इत्यादि अनेक कामात पशुपासून मनुष्य साहाय घेतो. यावरून म्हटलें आहे कीं " जीवो जीवस्य जीवनम् " जर जीवाचा जीव भक्षण असते तर लिहिलें असतें कीं " जीवो जीवस्य भोज-नम् " परन्तु असें लीहीले नसतानाही अर्थाचा अनर्थ करुन वाईट लोक भोळ्या लोकास बुड वितात अतः करण त दीर्घ दृष्टीनें जग विचार करुन पहा ४ मास भक्षण हें मनुष्याचें भक्ष्य

नाहीं जी जनावरें मास भक्षण करितात त्याच्या शरीराचे अवयवही वेगळ्या प्रकाराचे असतात ते शस्त्रादिकाच्या साहायावाचूनही प्राण्याचा विध्वस करून कच्चे मास भक्षण करितात आणि त्यानां तें पचन होतें मनुष्याचे अवयव तसे नाहींत. मनुष्यास शस्त्राशिवाय व अग्निसस्कारा शिवाय तें पचत नाहीं तसेंच अग्नि वर शिजविल्यानतर सुद्धा मास भक्षण केले तरी पण त्यापासून अनेक रोग होतात असें विद्वान इग्रेजी डाक्टराचे ह्मणणें आहे'— STARCH-SUGAR (स्टार्च शुगर) नावाचा पदार्थ मासात नसल्यामुळें SCURVY (रक्तपिती) चा रोग उत्पन्न होतो, आणि मास भक्षण केल्यानें "मिटूफिवर" एक प्रकाराचा ताप येतो यावरून असें सिद्ध होतें कीं मनुष्य मास-आहारी नाहीं ५ कित्येक लोक असें ह्मणतात कीं आह्मी आयते मास विकत घेतो आणि

खातो, परतु हातानें हिंसा करित नाहीं, म्हणून आह्मास पाप लागत नाहीं हेंही त्याचे ह्मणणे नीतिविरुद्ध आहे, का की मनुस्मृतींत पाचव्या अध्यायाच्या तिसऱ्या भागामध्यें ८ जणास घातक ह्मटलें आहे —

अनुमन्ता विशसिता । निहन्ता क्रयविक्रयी ॥
सस्कर्ता चोपहर्ताच । खादकाश्चेति घातका: ॥

अर्थात्–१ प्राण्यास मारण्याची आज्ञा देणारा २ शस्त्र देणारा, ३ मारणारा, ४ घेणारा, ५ देणारा, ६ शिजविणारा, ७ वाढणारा आणि ८ खाणारा ही मनुष्यें घातकाची अधिकारी आहेत. आता पहा तुमची सुटका कशी होईल ती ६ त्याच मनुस्मृतींत मासाचा अर्थ असा केला आहे की–मा=माझे×स=सारखे अर्थात् जसे माझे हाल तू करित आहे (भक्षित आ`स) त्याचप्रमाणें मी तुझे हाल करणार भक्षणार! अहो मास भक्षण करणाऱ्या हिन्दूनों! आपल्या घरात मनुष्याचा

मृत्यु झाल्यानन्तर त्याला स्मशानात नेऊन जाळिता, अघोल केल्यावाचून घरातही येत नाहींत, आणि त्याचे बारा दिवसापर्यंत सूतक पाळिता ? मग बकरा वगैरे प्राण्यास घराचें आगणात ठार मारून त्याचा मास घरात चुलीवर शिजवून ते खाता याचें सूतक किती दिवसाचें विष्टाला पाहून तुह्मी थू थूः करिता रक्ताचा थेंब अंगास लागला असता धुऊन टाकिता, तर विष्टा रक्तानें भरलेला मासाचा टुकडा खाताना तुह्माला कशी घाण येत नाही ?

—:*:—

## यज्ञातही जीवाचा वध करू नये.

किस्यक लोक ह्मणतात कीं यज्ञाच मास किंवा मत्रानें पवित्र केलेलें मास पवित्र असतें हें त्याचें ह्मणणें राक्षसासारखें आहे

## अभंग.

ऐसे कैसें रे सोंवळें । शिवता होतसे ओवळें ॥१॥
स्नानसंध्या टिळे माळा । पोटीं क्रोधाचा उमाळा॥२॥
नित्य दंडितोसी देह । तरी फिटे न संदेह ॥३॥
त्याग केली झळ फळ । देहबुद्धिचा विटाळ ॥४॥
नित्य नेम खटाटोप । मनीं विषयाचा जप ॥५॥
रामदास दृढ भाव । तेणें वीण सर्व वाव ॥६॥

पूर्वी त्रेतायुगात मांस भक्षण करणाऱ्यास राक्षस ह्मणत असत, असें ब्रम्हबोध नावाच्या ग्रन्थात लिहिलें आहे आणि श्रीमद्भागवताच ७ व्या स्कंधाचे १४ व्या अध्यायात सांगितलें आहे कीं वेदाच्या आज्ञेला अनुसरून " प्राचीनबर्ही " नावाचे राजानीं यज्ञात अनेक पशुचें हवन केलें, त्याचा उद्धार करण्यास्तव नारदऋषि तेथें येऊन बोध करू लागले, तें श्लोक —

भो भो प्रजापते राजन् । पशून् पश्य त्वयाऽध्वरे॥
सञ्ज्ञपित. जीवसंघान—निर्घृणेन सहस्रशः ॥७॥
एतत्त्वा सम्प्रतीक्षन्ते । स्मरतो वैशसं तव ॥
सपरेतमय कूटै. । छिंदंत्युत्थितमन्यव ॥ ८ ॥

अर्थ—हेराजा ! तू यज्ञात हजारों पशुंचा वध केला, ते प्राणी तुझी मार्गप्रतीक्षा करित आहेत, कारण, तू ज्याप्रमाणें त्याना मारलेस त्याप्रमाणें तुझा मृत्यु झाल्यानंतर तुला मारण्याकरिता ते तयार आहेत असें सांगून नारदऋषिनीं त्यास ते पशुही दाखविले, ते पाहून राजा भ्याला. तेव्हा नारदऋषि ह्मणाले कीं:—

देवोपहारव्याजेन । यज्ञव्याजेन येऽथवा ॥
घ्नन्ति जतून् गतघृणा । घोरं ते यान्ति दुर्गतिम्

अर्थात्—जी निर्दय मनुष्यें देवाच्या उपहार निमित्त [ भेटी करिता ] अथवा यज्ञाच्या निमित्तानें जी निर्दयी मनुष्यें जी

तात ते प्राणी भयकर दुर्गतींत [ नर्कात ] जातात

अन्धे तमसि मज्जमा । पशुभिर्ययजामहे ॥
हिंसा नाम भवेद्धर्मो, न भूतो न भविष्यति ॥

अर्थात्—जर आह्मी पशुपासून देवादिकाची पूजा करू लागलो अर्थात् यज्ञाच्या नावानें पशूचा घात करू लागलो तर अन्धतम नर्कात बुडून जाऊ का कीं हिंसा केल्यापासून धर्म झाला नाहीं आणि होणारही नाहीं.

ज्ञानपाल्नि परिक्षित ब्रह्मचर्य दयम्मति ॥
स्नात्वातिविमले तीर्थे । पापपकापहारिणि ॥१॥
ध्यानाग्नौ जीवकुदरे । दममारुतदीपिने ॥
असत्कर्मसमिन्क्षेपैरग्निहोत्र कुरूत्तम ॥२॥
कषायपशुभिर्दुष्टै । धर्मकामार्थनाशकै ॥
शममन्त्रहुतैर्यज्ञ । विधेहि विहित बुध ॥३॥

अर्थात् ज्या तीर्थांत ज्ञानरूपी पाळ आहे

ब्रह्मचर्य आणि दयारूपी पाणी आहे, पापरूपी पंकाचा ( चिखलाचा ) विनाश करणाऱ्या अशा विमल तीर्थात स्नान करून जीवरूपी कुंडात दमरूप पवनानें प्रदीप्त झालेल्या ध्यानरूपी अग्निमध्यें वाईट कर्मरूपी लाकडें टाकून उत्तम अग्निहोत्र कर आणि धर्म अर्थ कामाचे नाशक जे दुष्ट कषाय [ क्रोध मान माया लोभ ] रूप पशु आहेत त्यांना शमरूपी मंत्रानें हवन कर, अर्थात् या प्रकारें बुध ( विद्वान ) लोकांनीं सांगितलेलें यज्ञ तू कर ॥ ३ ॥

तसेंच अश्वमेध ह्मणजे मनाला जिंकणें, गोमेध= वाणीला जिंकणें, नरमेध=कायाला ( कामाला ) जिंकणें, आणि अजामेध ह्मणजे इंद्रियांना जिंकणें इत्यादि बोध ऐकून राजानें पापयज्ञाचा त्याग करून धर्मयज्ञ स्वीकार केला ह्यावरून असे दिसतें कीं शास्त्रात जीववध केल्याची माफी नाहीं आणि वेदमंत्राचा कित्येक लोक असा अर्थ

करितात कीं पशूला अग्नित जाळल्यानें ( यज्ञ केल्यानें ) धर्म आहे परंतु हा अर्थ खरा असतो तर वर्तमान काळीं झालेले स्वामी दयानन्दा साारख्यानीं वेदाचा अर्थ का फिरविला असता ? यावरून उघड दिसतें कीं रसलोलुपी लोक आपला स्वार्थ साधण्याकरिता अर्थाचा अनर्थ करितात, सुज्ञ मनुष्यानीं प्राप्त झालेल्या बुद्धिनें विचार करून खरा अर्थ स्वीकारावा

वैष्णवलोक ह्मणतात कीं ईश्वरानें मत्स्यावतार कूर्मावतार वराहावतार आणि नरसिंहावतार असें चार अवतार पशुयोनींत धारण केले आतां विचार करा कीं ज्या प्रिय योनींत ज्यानीं अवतार धारण केले तेंच त्यास मारण्याची आज्ञा देतील काय ? आणि ज्या योनींत देवानें अवतार धारण केला त्या प्राण्याचा वध करणाऱ्या व त्यास भक्षण करणाऱ्या अधम मनुष्याची काय गति व काय स्थिति होईल ? कि-

द्द शास्त्राचें प्रमाण वर दाखविलें, त्यावरून नि श्चय झाला कीं मनुष्याला मासाहार शास्त्रविरुद्ध असून रोग उत्पन्न करणारा आहे आणि दोन्हीं लोकांत दु ख देणारा आहे

---

## " मुसलमानाच्या शास्त्राधारानें मासभक्षणाचा विषेध "

मुसलमान लोकाचें जें " कुरान शरीफ " ह्मणून मोठें व सर्वमान्य शास्त्र आहे त्यातही मास भक्षण करण्याची सक्त मनाइ केली आहे कुराने शरीफाची " सुरा अन अए ' मध्यें लिहिले आहे तें पहा.

ت عليكم الميتة والدم ولحم الخنزير وما اهل لغير الله به والمنخنقة والموقوذة
ردية والنطيحة وما اكل السبع الا ما ذكيتم وما ذبح على النصب وان تستقسمو
لام ذلكم فسق اليوم يئس الذين كفروا من دينكم فلا تخشوهم واخشون
اكملت لكم دينكم واتممت عليكم نعمتي ورضيت لكم الاسلام دينا فمن اضطر
مخمصة غير متجانف لاثم فان الله غفور رحيم

याचा अर्थ असा आहे कीं ज्या मासात रक्त असेल तें मास, डुकराचें मास, मरण पावल्याचे मास, गळ्यास फास लाऊन मारलेल्याचे मास, मूर्तीच्या नावानें मारलेल्याचें मास, शस्त्रानें मारलेल्याचें माम, कोठेही पडून मेले त्याचे मास, आणि दुसऱ्या प्राण्यानीं मारुन टाकलेल्याचें मास इतक्या प्रकारचे मास खाऊ नये असें सागितलें आहे

सुज्ञ बधूनो ! आता सागा कीं कोणत्या प्रकारानें मास भक्षावयाचें राहिलें ? तें म्हणतात कीं हातानें गळ्यावर सुरी फिरवून आह्मी जनावरानां मारतो [ हलाल करितो ] तें मास खाण्याची आह्मास परवानगी आहे परन्तु हें म्हणणें साचे खोटें आहे का कीं वरील आयतनावरून शस्त्रानें मारलेल्या जनावराचें मास खाण्याची मनाई केली आहे २ आणखी पहा "सुराउलमायद" ४ प्यारा २ मजल ३ आयतनाम–

ध्यें लिहिलें आहे की "मक्का शरीफ" हें मुसलमान लोकाचे मोठें तीर्थस्थान आहे, त्याची हद्दींत केव्हाही कोणत्याही प्राण्याचा वध करू नये आणि कोणाचे हातानें चुकून वध झाला तर त्यानें आपल्या पाळलेल्या जनावरापैकीं एक जनावर तेथें सोडून द्यावें ते नसल्यास ज्या जनावराचा त्यानें वध केला असेल त्या जनावराची जी किंमत असेल तितक्या पैशाचें अन्न विकत घेऊन फकीरास वाटून द्यावें मुसलमान लोकाचे देवानें हें काम अपवित्र मानलें आहे ह्मणून अशा उत्तम ठिकाणीं असें दुष्कर्म करण्याची साफ मनाई आहे ३ ह्याच प्रमाणें मुसलमान बधु बकरी—ईदचे दिवशीं बकऱ्याचा वध करितात तेंहीं त्यांच्या शास्त्राविरुद्ध आहे पहा— सुराह हजची ३६ सावी आयत:—

لن ینال اللہ لحومها ولا دماؤها ولکن یناله التقوی منکم

ہرگز نہیں پہنچتے اللہ کے پاس (قربانی کے) گوشت اور ان کے خون البتہ پہنچتا ہے اللہ کے پاس تمہاری طرف سے
تقوی اور پرہیزگاری)

ह्यात अल्ला तालानीं खुद्द सांगितलें आ-
हे ०कीं मास आणि रक्त मला पहोंचणार ना-
हीं, एक परहेजगारी ह्मणजे पापभीरुत्व पोंचेल "

– ईदचे दिवशीं दुम्बा मारण्याचा हेतु—
इब्राहिम पैगंबराचे इमानाची कसोटी पहाण्या-
करता त्यास अल्ला तालानें हुकुम दिला कीं, ' तु
झ्या प्रिय वस्तुचा मला भोग दे ' तेव्हा पैगंबराने
आपला एकुलता एक मुलगा इस्माइलास बळी
देण्याचें ठरविलें आणि आपलें डोळ्यावर फड-
कें बांधून व आपले हातांत सुरी घेऊन तो मारू
लागला परंतु त्यावेळीं मुलाचे जागीं दुम्बा आ-
ला होता तो मेला व मुलगा वाचला ( कित्ये-
कांचे असेंही ह्मणणें आहे कीं दुम्ब्यासही
सजीवन केलें ) त्या दिवसापासून हा रिवाज
चालू झाला असें त्यांचें पुस्तकांत लिहिलें आ-
हे सुज्ञ बंधूनो ! आता आपण अंतःकरणांत

परन्तु—१ "कातेउल शजर" झाडाला कापणारा, २ "जावे उलबकर" गोवध करणारा आणि ३ "दायमुलखमर" दारु पीणारा अशा तीन मनुष्यांची प्रार्थना त्या दिवशींही तो ऐकणार नाहीं अर्थात यालाही दोजख ( नर्का ) ची शिक्षा त्या दिवशीं होईल

४ आणखी मुसलमान धर्माचे शास्त्रांत असें लिहिले आहे कीं कियामतचे दिवशीं मा-

---

थोड्या खोल दृष्टीनें विचार करा, कीं अल्ला तालाचा मुख्य हेतु काय होता? जर ईश्वरास दुम्बा प्रिय असता तर त्यानें दुम्बाचा भोग मागितला नसता काय" दुम्बा मुलाचा रक्षणाकरिता ठेवला होता परन्तु भक्षणाकरितां ठेवला नव्हता यास्तव आपली प्रिय वस्तु ईश्वरास इदीचें दिवशीं न देता दुम्बाचा वध करणें हा न्याय कोणत्या ठिकाण्याच्या आहे?

गेलेलीं मनुष्यें आणि जानवरें सर्व जीवत होऊन, ज्यानीं प्राण्याला मारलें असेल किंवा दुःख दिलें असेल त्याना ते उलट ठार मारतील आणि नन्तर योग्य इन्साफ करून ईश्वर पाप्यास दोजख ( नर्कांत ) आणि धार्मिकास बेहिस्त ( स्वर्गांत ) पाठऊन देईल यास्तव हे बधूनो ! पातकाचा मोबदला घेतल्यावाचून सुटका होणार नाहीं, हें खाचित समजा ? ? ? ५ आइन अकबरींमध्ये लिहिलें आहे कीं अकबर बादशहा दर शुक्रवारापासून रविवारापर्यन्त, ग्रहणाचे दिवशीं तीर दिवसाचे जसनाचे दिवशीं, फरवरदी आणि आबान ह्या दोन महिन्यांत बिलकुल मासाहार करित नसें ६ तसेंच ४० दिवसाची एक धर्मक्रिया कित्येक लोक करीत असतात त्यास "सिल्लो" असें म्हणतात, त्यांत ही मास भक्षण करित नाहींत त्याना जर विचारलें तर ते सागतात किं—मास ही वाईट

वस्तु आहे, त्याचे भक्षणानें बंदगातीं खलील पोहोंचते ह्मणजे भक्तींत व्यत्यय येतो आताही हज करण्याकरिता जे मक्काशरीफाला जातात ते तेथें आपल्या शरीरावर एक वस्त्र ठेवितात व त्या वस्त्रात जर एखादी ऊ निघाली तर तिला खाली न टाकिता त्या वस्त्रातच राहू देतात असे दयाळु धर्मस्थापक कधीं जीववध करण्याची व मास भक्षण करण्याची आज्ञा देतील काय ? कदापि नाहीं असे निश्चयानें समजा आता जे वाइट रिवाज जातींत शिरले आहेत ते सर्व रसलोलुपतेचे कारणानें झाले आहेत ह्मणून सुज्ञ पुरुष याचा पूर्ण विचार करून अशा वाईट रूटीचा त्याग करतील आणि सत्य धर्माचा स्वीकार करतील तरच त्याचें कल्याण होईल

—*०*—

# त्रस जीवाच्या रक्षणाचे नियम.
## १ रात्री भोजनाचे दोष.

रात्रीं अन्नाचे व पाण्याचें सेवन करू नये, का कीं रात्रीं शीतलता असल्या कारणानें जीवांचे गमन विशेष होत असतें, आणि अंधकार असल्यामुळे तें दिसतही नाहींत दिव्याचा किंवा वीजेच्या दिव्याचा प्रकाश रात्रींत केला तरीही दिवसासारखा उजेड पडणार नाहीं व त्या प्रकाशानें नेत्र जीव आकर्षिले जातात, आणि येऊन पडतात यास्तव रात्रीं भोजन केल्यामुळें व पाणी प्याल्यामुळे त्रस जीवांचा घात अवश्य करून होतो आणि त्या भोजनापासून शारीरिक मानसीक धार्मिक अनेक प्रकारचें नुकसान होतें

हत्वाभिपद्मसंकोचश्चंडरोचिरपायत ॥

अतो नक्त न भोक्तव्य । सूक्ष्मजीववधादपि ॥
आयुर्वेद

अर्थात्— सूर्यास्त झाल्या नतर हृदयकमळ आणि नाभिकमळ सकोच पावतात म्हणून रात्रीं भोजन केल्यानें रोगाचा उद्भव होऊन सूक्ष्म जतूचा सहार होतो

मेधा पिपीलिका हन्ति । यूका कुर्याज्जलोदर ॥
कुरुते मक्षिका वान्ति । कुष्टरोगश्च कौलिक ॥१॥
कटको दारुखडच । वितनोति गलव्यथा ॥
व्याजनातर्निपातित । तालु विद्धयन्ति वृश्चिका ।२।

अर्थात्—मुगीचे भक्षण केल्यानें बुद्धी नष्ट होते, ऊ भक्षण झाल्यास जलोदर नावाचा रोग होतो माशी खाण्यात आली तर वमन (उल्टी) होते, कोळी ( मकडी ) च्या भक्षणानें शरारात कुष्टरोग होता, कॉट्याचे भक्षणानें गडमाळा होतात केसानें स्वरभग होतो, विंचवाच्या काट्यानें टाळ्याला छिद्र पडतात असे महाभयकर

रोग उत्पन्न करणारें रात्रीचे जेवण आहे

अस्तगते दिवानाथे । आपो रुधिरमुच्यते ॥
अन्न मांससमं प्रोक्तं । मार्कंडेन महर्षिणा ॥

मार्कंडेय पुराण

अर्थात्–महर्षि मार्कंडेय ह्मणतात कीं रात्रीं अन्न मांसाप्रमाणें व पाणी रक्ताप्रमाणें आहे. यास्तव सोडलें पाहिजे

नैवाहुतिर्नंच स्नानं । न श्राद्धं देवतार्चनं ॥
दानं न विहितं रात्रौ । भोजनं तु विशेषतः ॥

स्कन्धपुराण

अर्थात्–रात्रीं देवाला आहुती देणें, स्नान करणें, श्राद्ध करणें, देवपूजा करणें, दान देणें, हें सर्व वर्ज्य आहे आणि भोजन करणें तर विशेष वर्ज्य आहे

ये रात्रौ सर्वदाहारं । वर्जयंति सुमेधसः ॥
तेषां पक्षोपवासस्य । फलं मासेन जायते ॥

अर्थात्–जे बुद्धिमान सदोदित रात्रींत भोज

नाचा त्याग करितात त्याना एका महिन्यात पधरा उपवासाचें फळ मिळतें

— ※ —

## २ अणगळ पाणीचे दोष

सूक्ष्माणि जतूनि जलाश्रयाणि ।
जलस्य वर्णाकृतिसंस्थितानि ।
तस्माज्जल जीवदयानिमित्त ।
निरग्र शूरा परिवर्जयन्ति ॥
भागवत पुराण

अर्थात्—पाण्याच्या आश्रयानें सूक्ष्म जीव राहतात त्याचा वर्ण आणि आकृति पाण्याप्रमाणेंच असते, यास्तव धर्मात्मा पुरुष जीवाचे रक्षण करण्याकरिताच सजीव [ कच्चे ] पाणी पीत नाहींत आणि उष्ण निर्जीव पाणी पीतात ॥१॥

वरील श्लोकावरून स्पष्ट दिसतें कीं पाण्यात असख्यात त्रस [ हलन चलन करणारे ] जी-

त्याचे निवास स्थान आहे ह्मणूनच आणखी महाभारतात ह्मटलें आहे

सवत्सरेण यत्पाप । कैवर्तस्य हि जायते ॥
एकाहेन तदाप्नोति । अपूतजलसंग्रह ॥

अर्थात्--मासे धरणाऱ्या धिवरास एका वर्षांत जेवढें पातक लागतें तेवढें पातक एकाच दिवशीं अणगळ पाणी वापरण्यानें लागतें यास्तव त्या जीवाचे रक्षण करण्याकरिता मनुस्मृतींत म्हटलें आहे कीं "वस्त्रपूत जल पिबेत्" अर्थात वस्त्रगाळ करून पाणी प्यावें

विंशत्यगुलमान तु । त्रिंशदगुलमायतं ॥
तद्वस्त्र द्विगुणीकृत्य । गालयेज्जलमा पिबेत ॥१॥
तस्मिन् वस्त्रस्थितान् जीवान् । स्थापये जलमध्यतेः॥
एव कृत्वा पिबेत्तोय । स याति परमा गतिं ॥२॥

महाभारत अनुशासनपर्व

अर्थात्--वीस अगुल रुंद आणि तीस अगुल

लाव अशा दुहेरी वस्त्रातून पाणी गाळून जे घेतात, आणि वस्त्रामध्यें राहिलेल्या जीवाना ज्या ठिकाणचें पाणी असेल त्या ठिकाणीं सोडतात ते स्वर्गगतीला जातात

— * —

## ३ पाहिल्यावाचून वस्तु वापरण्याचे दोष

स्थान, वस्त्र, पक्वान्न, कणिक, दाळ, भाजी, पा ी, ऊखल, लाकूड, गोवऱ्या, भाडीं वगैरे कोणतीही वस्तु डोळ्यानीं पाहिल्यावाचून कामात घेऊ नये कारण कित्येक वस्तुमध्यें त्रस जीव आपलीं घरें करून रहातात आणि कित्येक वस्तुचा आश्रय घेऊन वसतात म्हणून त्या वस्तूंना जर आपण पाहिल्यावाचून कामात घेतलें तर त्याचा नाश होतो, आणि विषारी प्राणी त्यात सापडला तर आपणासही त्यापासून दुःख होतें

—*०*—

## ४ पातळ पदार्थ उघडे ठेवण्याचे दोष

दूध, दही, नाक, लोणी, तूप, तेल, पाणी वगैरे पातळ पदार्थांची भाडीं केव्हाही उघडीं ठेऊ नयेत कारण त्यात त्रस जीव पडून मरण पावतात, वस्तुचा नाश होतो आणि भक्षण केल्यानें अनेक रोगाची उत्पत्ति होते

---

## फुटकळ जीवरक्षणाचा बोध

कित्येक अधर्मी लोक घरात वाड्यात वगैरे ठिकाणी चिलटें झालीं तर धूर करून त्याना मारतात बाजामध्ये अथवा पलंगात ढेंकूण उत्पन्न झालें तर त्याच्यावर ऊन पाणी ओतून त्याना पाण्यात टाकून किंवा दीव्याच्या जोतीनें त्याना मारतात दाण्यात कीडे पडले तर पाण्यात दाणे ओततात, अशा प्रकारचें जीवहिंसेचें कृत्य करणे

धर्मात्म्याला योग्य नाहीं, आपल्या आत्म्याप्रमाणें सर्व जीव समजावेत

त्रस जीवाच्या सरक्षणाचे कित्येक नियम वर दाखविले आहेत ससारात राहात असताना आणि पुष्कळ कामें करित असतानाही जर विचार करून केलीं तर पुष्कलशा त्रसजीवाचा बचाव होईल

—— ❀ ——

## स्थावर प्राण्याचे सरक्षण

ससारातील पुष्कळ कामें स्थावर प्राण्याची हिंसा झाल्यावाचून होत नाहींत यास्तव स्थावर प्राण्याच्या हिंसेचे दोन विभाग केले आहेत १ सार्थक हिंसा आणि २ अनर्थक हिंसा जें कार्य केल्यावाचून चालत नाहीं त्या कामा पुरतीच हिंसा करणें त्यास सार्थक हिंसा, असें ह्मणतात आणि कामापेक्षा अधिक प्राण्याची हिंसा करणें

त्यास अनर्थक हिंसा असें ह्मणतात.

पृथ्वी काय—१राहण्यास घर आहे तरीही दुसरें घर गोंधणे, कच्च्या मातीनें हात धुणें, मातीनें दात घासणें, विनाकारण जमींन खादणें, मीठ, गेरू वगैरा मातीचा व्यापार करणें इत्यादि पृथ्वी काय जीवाची अनर्थक हिंसा धार्मिक लोकास अयोग्य आहे २ अप काय (?) सरोवर विहीर आड तलाव नदी वगैरे जलाशयामध्यें उतरून स्नान केल्यानें पाणी दुर्गन्धी होऊन रोगिष्ट होतें आणि शरीराच्या स्पर्शानें लाट उमळून त्याचें हेलकावें जेथेंपर्यंत जातात तेथेंपर्यंत कित्येक जीवाचा वध होतो, यास्तव पाण्यात उतरून स्नान करणें हाही अनर्थ आहे

(२) अज्ञानामुळें कित्येक मनुष्य मेलेल्या शरीराची राख तीर्थाचे ठिकाणीं पाण्यात टाकितात हाही अनर्थच आहे का कीं राख हा खार पदार्थ आहे आणि अस्थि [हाड] पाण्यात पडल्यामुळें

पाणीं तापतें, त्यानें असंख्य प्राणी मरतात आणि मेल्यानंतर नाशवत शरीराचा कितीही यत्न केला तरी त्या जीवास स्वर्ग मिळत नाही. त्यानें जशीं कर्में केलीं असतील तशी गती त्याला मे-ल्याबरोबर तेव्हाच मिळते

[ ३ ] कित्येक भोळे लोक ग्रहण सपल्या न तर घरातले पाणी बाहिर साडितात, हाही अ-नर्थ आहे, का कीं सरोवरात जें उघडें पाणी हों-तें व ज्याच्यावर ग्रहणाची प्रत्यक्ष छावली पड-ली तें पाणी घरात आणितात, आणि घरात झाकुन ठेवलेलें पाणी बाहिर फेंकून देतात हा केवढा मूर्खपणा आहे ! घरातील पाण्याला जर ग्रहण लागलें तर दुसरे कित्येक पदार्थ दूध दही तूप वगैरेही आहेत त्यानाही ग्रहण ला गलें, ते का बाहिर फेंकून देत नाहींत ? तेव्हा ते ह्मणतात कीं त्यात तुळशीपत्र घालून ठेविलें होतें मग पाण्यात घालून का ठेविलें नाहीं परन्तु

दुसऱ्या वस्तुस पैसे लागतात आणि पाणी फुकट मिळतें ह्मणून त्याचा अनादर आहे मूर्ख लोकाना एवढें समजत नाहीं कीं हें जीवन आहे त्यावाचून एक क्षणभरही चालत नाहीं ! रत्नापेक्षा हें पाणी अधिक मौल्यवान आहे त्याचें निनाकारण नुकसान करणें हेंही महा पातक आहे असें जाणून पाण्याची अनर्थ सोडली पाहिजे

२ अग्नि काय ( १ ) पांघरण्याकरिता पुष्कळ वस्त्रे असूनही कित्येक लोक थंडी निवारण्यास्तव उगीच रस्त्यातला कचरा गोळा करून पेटवून तापत बसतात, त्या प्रमाणें संसारात अनेक कामास येणारें सरपण, गवत, वाळलेलीं पानें वगैरे जाळून शेंक करीतात हाही अनर्थच आहे कारण कीं असें केल्यापासून एका बाजून उष्णता व एका बाजूस शीतता राहाती, यामुळें शरीरास सरद गर्मीचा उपद्रव होतो आणि चु-

पाणीं तापलें, त्यानें असंख्य प्रा-
मेल्यानंतर नाशवत शरीराचा
केला तरी त्या जीवास स्वर्ग मि
जशीं कर्में केलीं असतील तशी
त्याबरोबर तेव्हाच मिळतें

[ २ ] कित्येक भोळे लोक ग्रह-
तर घरातले पाणी बाहिर साडित-
नर्थ आहे, का कीं सरोवरात जें उ
तें व ज्याच्यावर ग्रहणाची प्रत्यक्ष
ली तें पाणी घरात आणितात,
झाकुन ठेवलेलें पाणी बाहिर फेंकू
केवढा मूर्खपणा आहे! घरातील
ग्रहण लागलें तर दुसरे कित्येक
दही तूप वगैरेही आहेत त्यानाही
गले, ते का बाहिर फेंकून देत नाहींत
क्षणात कीं त्यात तुळशीपत्र घालून ठे
मग पाण्यात घालून का ठेविलें ना

४ वायुकाय - (१) झोंपाळ्यावर वसण्यामुळें कित्येकाचे मृत्यु झाले आहेत, हाही अनर्थ आहे (२) पत्ता वादिंत्रादिचा बचाव होईल तोपर्यंत कारावा ४ वनस्पति तीन प्रकारच्या आहेत (१) धान्यामध्यें एका दाण्यात एकच जीव असतो (२) हिरवी भाजी फळ शेंगे वगैरे ह्याचे लहान शा टुकड्यात असख्यात जीव असतात (३) कांदे, लसुन, बटाटे, गाजरें, रताळीं वगैरे जे जमिनींत उत्पन्न होतात त्याच्या एक लहानशा टुकड्यात अनत जीव असतात याचा विचार करून, धान्यावाचून चालणें अशक्य आहे, परतु भाजी पाला फळ फळावळ खाण्यांचे कमी केलें तर फारच उत्तम आहे कदमूळ ( भूइकद ) हे धर्मात्म्यानीं कधीही खाऊ नयेत, का कीं हें जमीनींत कितीही दिवस राहिले तरी पण पिक्त नाहींत आणि अपक गर्भास पोट फाडून बाहेर काढतात, त्या प्रमाणें पृथ्वीचें पोट फाडू-

न कद बाहेर काढतात, ह्मणून याचें भक्षण करणें अनर्थकारी आहे

वरील हिंसाचे कर्तव्यात जेथे अनर्थ दाख विले आहेत, त्यापासून जन्मपर्यन्त निवृत्ति केली तर फारच चागलें नाहीं तर निदान गृ हस्थानीं स्थावर जीवाचे हिंसेविषयीं नियम धा ‑रण केले पाहिजेत, कीं आजच्या दिवसात किं‑वा महिन्यात किंवा या वर्षांत त्याच प्र ाणें माझ्या सर्व आयुष्यात इतके तोळे, शेर मणाचे वरती—माती, पाणी वनस्पती यांची हिंसा मी करणार नाहीं दिवे चुली पले वगैरे इतक्याच्या वर लावणार नाहीं, अशा प्रकारें संसारात जितकीं हिंसेचीं कर्तव्ये आहेत त्याची मर्यादा केली पाहिजे ( शपथ घेतली पाहिजे ) मर्यादा करण्यापूर्वीं पुढला पूर्ण विचार करावा कीं इतक्या वस्तु मोकळ्या ठेविल्यानंतर आपल्या कोणत्याही कामात नड येणार नाहीं एक तोळा

वस्तु लागेल तेथें दोन तोळे वस्तु ठेविली तरी हरकत नाहीं, परंतु मर्यादा केल्या नंतर प्राण गेला तरी तिचा भंग होता उपयोगाचा नाहीं, असें केल्यानें इच्छा तृष्णा कमी होऊन संतोष प्राप्त होतो आणि पापही कमी होतें, ह्मणून मर्यादा करणें हें धर्मात्म्याचें मुख्य कर्तव्य आहे असें करता करता कोणते तरी एकादे दिवशी सर्व हिंसेपासून विरक्त होण्याची संधि मिळेल

## स्वात्मरक्षा करण्याचा बोध.

अहिंसा धर्माचा पालण करण्याकरीता जे नियम वर सांगितले ते पर आत्म्याची रक्षाविषयक आहेत, परन्तु जो आपल्या आत्म्याची रक्षा करील तोच पर आत्म्याची रक्षा करू शकेल ह्मणून स्व आत्म्याची रक्षा करण्याकरिता काही उपदेश करितो

सागितलें आहे ससारिलोक मोहमायामध्यें फ सून क्षणिक कीर्ति मिळविण्याकरिता प्रयत्न करीतात आणि विषयोपभोगामध्यें रत होऊन मनुष्यजन्माला व्यर्थ दवडितात, ते आपल्या आत्म्याशी विश्वासघात करीतात

वर जो सहाकाय प्राण्याची रक्षा करण्याची सागितली ती दिसण्यास पर आत्म्याची रक्षा दिसते, परतु अतर्यामी ज्ञानचक्षुनीं विचार केला तर ती स्व आत्म्याची रक्षा आहे का कीं आपण जर दुसऱ्याला दु ख दिलें किंवा घात केला तर त्याचा मोबदला त्याचप्रमाणें ह्या ज न्मात अथवा पुढचे जन्मात आत्म्याला अवश्य भोगावा लागतो त्यास आत्महिंमा म्हणतात आणि आपण कोणाला दुःख दिलें नाहीं किंवा घात केला नाहीं तर आपणासही कोणीं दुःख देणार नाहीं आणि घात करणारही नाहीं या-

टाकते, मग सेवन केल्यानें त्याचा परिणाम वाईट होतो ह्यात काय संशय ? ह्मणूनच साधुलोक सर्वथा ब्रह्मचर्यव्रत धारण करिता त आणि स्त्रीजातिला मातृ भगिनी प्रमाणें समजतात परंतु गृहस्थानीं तसें होणें कठिण आहे गृहस्थाश्रमात विषय सेवन करण्याची गरज पुत्र प्राप्ति करता असतें तें कार्य साधण्या- स स्वस्त्री ऋतुस्नान झाल्यावर एक दोन दिव सच असतें पुढे सर्व महिना ब्रह्मचर्य पाळीलें पाहिजे वीर्यास शरीराचा राजा असें ह्मटले आ- हें त्याचें जितकें रक्षण होईल तितकें आत्म्या- ला जास्त सुख प्राप्त होतें बुद्धी, कांति, परा- क्रम, आखेर पर्यंत कायम ठेवण्याचा ह्याच उ- पाय आहे जे वीर्याचें रक्षण करित नाहींत वि- षयोपभोगातच सुख मानून बसले आहेत तें शारिरिक संपत्तीचा, बुद्धींचा, कांतीचा नाश क- रून गरमी परमा इत्यादि दुष्ट रोगाच्या फंधात

फसून अती दुःखानें व्याकूल होऊन अकाळी मृत्युमुखीं पडतात म्हणूनच काम हा शत्रु आहे, त्याच्या नादी लागणार आत्मघातकी होतो; आणि ब्रह्मचर्य पालणार स्वात्म्याची रक्षा करणारा होतो

२ "क्रोध '– या शत्रुला शास्त्रात अग्नीची उपमा दिली आहे जसें विस्तवापासून वस्तुचा नाश होतो, तेथें–दया, क्षमा, शाल, सतोष, प्रेम, भक्ति, विनय, तप, सयम, समाधि वगैरे सुगुणा ना भस्म करून त्याचा ताप शरीरास पोंचतो त्यानें मनुष्य–सुरूपाचा कुरूपी, सद्गुणाचा दुर्गुणी प्रेमीचा अप्रेमी, बनून, जगात अपयशरूप दुर्गन्धाचा प्रसार करितो का कीं सतप्त झालेला मनुष्य क्रोधानें अध होऊन आइ, बाप, गुरु, शिष्य, शिष्या, बधु, भगिनी, स्वामी, स्वामिनी, सेवक, मित्र, स्वजन, उपकारी इत्यादि कोणाचीही मर्यादा ठेवित नाहींत, आणि प्राण घेण्यास-

ही उशीर करीत नाहीं असा जबर क्रोध शत्रु
आहे ह्मणूनच मुसलमान लोक याला गुस्सा (गू=
विष्टा+सा-सारखा) ह्मणतात याचा निग्रह करण्या
करिता क्षमा खड्ग धारण केलें पाहिजे ह्मणजे
( १ ) आपणास कोणी अपशब्द बोलला किंवा
शिवीं दिली, तर त्याच्या अर्थाकडे लक्ष द्यावें, कीं
हा ह्मणतो तो दुर्गुण माझे अंगीं आहे कीं नाहीं
जर तो दुर्गुण आपल्या दृष्टीस पडला तर विचार
करावा कीं आपल्या शरीरातील रोगाची परीक्षा
करण्याकरिता वैद्यास फी द्यावी लागते, आणि
हा तर फी न घेता आपला दुर्गुण आपणास दा
खवितो ह्मणून याचे आभार मानले पाहिजेत
नंतर रोगाची पारख झाल्यावर त्याचा प्रतिका
(औषध) करितो त्याप्रमाणें दुर्गुणरूपी रोग
नष्ट होतील असे उपाय योजावेत ( २ ) आणि
दुसऱ्यानें सांगितलेले दुर्गुण जर आपले अंग
नसतील तर असा विचार करावा, कीं हीऱ्याल

जर कोणी खडा ह्मणाला तर तो जसा खडा होत नाहीं तसेंच आपणास कोणी दुर्गुणी ह्मटल्यानें आपण दुर्गुणी होत नाहींत मग वाईट मानण्याचें काय कारण ? काहीं नाहीं इत्यादि विचाररूप शस्त्रानें क्रोधशत्रुचें निवारण करावें

३ "मद" अभिमान हा तीसरा शत्रु आहे, आणि यास मद्याची उपमा दिली आहे जसें मद्यपान केल्यानें चागले विद्वान लोक भान विसरुन बीभत्स शब्द उच्चारण करितात, उकिरड्यावर लोळतात, आणि सधी सापडल्यास कुत्रेंही त्याच्या तोंडात लघुशंका करीतात ते भक्ष्याभक्ष्याचा विचार करित नाहीं, मदांध होऊन आई भगिनी पुत्री याचे बरोबर व्यभिचार करण्यास चुकत नाहींत. भाडीं दागिने घर वगैरे सर्वांच्या सत्यानास करून वासना पूर्ण करितात आणि अशा फजीतीनें अकालीं मृत्यूच्या ग्रास होऊन नर्कांत यमाच्या हातानें कढत असलेल्या शिशाचा आणि ताम्याचा

रसपान करितात त्याचप्रमाणें गर्विष्ट मनुष्य-ही मदांध होऊन नाव मिळविण्याकरिता दोन दिवसाची वाहवा व्हावी म्हणून घर धन वगैराना स्वतः वत्ती लावण्यास उशीर करित नाहींत थो-डका अपमान झाला कीं आत्मघात करून मर-तात, आणि नर्कांत यमाचा पाहुणा होऊन मार ताडन वगैरे यातना भोगित असता हजारों वर्षे रडून रडून काढीतात असा आत्मघातक हा मदरूप शत्रु आहे याचा नाश करण्याकरिता नम्रतारूप शस्त्र धारण केलें पाहिजे मनात अशा विचार करावा कीं— आपणास पूर्व जन्माचे पुण्याइनेंच उच्च स्थिति प्राप्त झाली आहे, आणि आपल्या आत्म्याला सुधारण्याकरिता उत्तम सा-मुग्रि मिळाली असून अभिमानानें नुकसान क-रून घेणें हा केवढा मूर्खपणा ? रावणासारख्या आणि कौरवासारख्या मोठ मोठ्या राजेश्वरास गर्वानें ख ली पाडलें ! मग माझी काय कथा ?

असे समजावें कारण कितीही संतती आणि अंगी बळ असलें तरी विनाशी शरीराचा व क्षणभंगूर संपत्तीचा नाश व्हावयास काय उशीर लागणार ? इत्यादि विचारानी निरभिमानी व्हावें

४ " मोहो "–( ममत्व ) संसारात सर्व दुःखाचे मूळ मोहशत्रुच आहे मोहान्ध होऊन आपल्या आत्मस्वरूपाला भुलून, हें माझें घर हें माझें कुटुंब, हें माझे धन, असें माझें माझें ह्मणत असतात रात्र दिवस चैन पडत नाही मोठे श्रीमान् विद्वानही धनाचे आणि कुटुंबाचे. भिगारी झाले आहेत हा प्रताप मोहराजाचा आहे या लोकात अनेक फजीती होऊन परलोकीं नर्ककुंडादि यातना मोहाच्या संनिधानेंच होते ह्या दुष्ट शत्रुचा पराजय करण्या करता विचार करावा, कीं रे प्राण्या ! तू एकटाच आलास आणि एकटाच जाणार तुझे कोणी नाहींत, आणि तूही कोणाचा नाहींस तू ज्याना

माझें माझें ह्मणत आहेस ते तुझे नाहींत, सर्व कुटुंब स्वार्थी आहे जो पर्यंत तुझ्या जवळ द्रव्य आहे आणि तुझें शरीर बळकट आहे तोपर्यंतच तू सर्वांना पाहिजे आहेस ते लोक तुझा सत्कार करीतात आणि तुझे हुकुमाप्रमाणें चालतात परंतु द्रव्य मिळविण्याची शक्ति नसली, किंवा द्रव्यसंचय संपला, आणि शरीराची शक्ति नष्ट झाली, ह्मणजे कोणीही तुला पुसणार नाहीं. उलट तटा करतील आणि संपत्तीवर मोह असला म्हणजे मरणकाळीं त्यावर वासना राहून "वासना तसें फळ" ह्या म्हणीप्रमाणें नंतर त्या ठिकाणी भूतक्रीडा सर्प स्थावर काय ह्या रूपामध्यें उत्पन्न व्हावें लागतें असा मोह दोन्हीं लोकांत दुःखदायक आहे यास्तव त्याचा त्याग करावा

अभंग

आयुष्य वेचूनी कुटुंब पोर्षोलें ।
काय हित केलें सांग बापा ॥१॥

फुकाचा चाकर झालासी कबाडी ।
नाहीं सुख घडी भोगावया ॥२॥
दुर्लभ मनुष्यजन्म कष्टें पावलासी ।
दिला कुटुंबासी काम भोगा ॥३॥
तुका ह्मणे ऐसे आयुष्य नाशिलें ।
पाप तें संचिलें पतनाशीं ॥४॥

"लोभ"—पापाचा जनक व पापाचा मूळ लोभच आहे. याच्या पाशात पडल्यानें क्षणार्धांत सद्गुणाचा नाश होतो, आणि हा पाश सुटणें ही फार कठीण आहे कारण कीं जसा जसा अधिकाधिक संचय होत जातो तसा तसा लोभही जास्त वाढत जातो त्यास तृप्त करण्याकरता मनुष्य क्षुधा, तृषा, थंडी, ऊन वगैरे दुःखें सहन करितो, तसेंच परदेशात डोंगरात समुद्रात धावत फिरतो, नीच लोकाची गुलामगिरी करितो वगैरे अनेक कष्ट सहन करून लोभाची तृप्ति करण्यास इच्छितो परंतु याची तृप्ति काही

होन नाहीं शेवटीं अन्तीं मृत्यूचा ग्रास होऊन पुढच्या जन्मीं वर सांगितल्या प्रमाणें विपत्ति भोगितो असा हा लोभरूप शत्रु आहे

दिंडी—येइ वेरक्त धधाम सचोटीनें ।
ठार बुडतो व्योपार त्यार्डानें ॥
द्रव्य लोभानें मत्य नाश होतो ॥
लोभ सकळा ओढोनि नरकिं नेतो ॥ १ ॥

लोभाचा निर्दलन करण्याकरिता संतोषरूप शस्त्र धारण केलें पाहिजे विचार करावा कीं, कितीही संपत्ती का असेना, खाण्यास शेरभर अन्न, पांघरण्यास २५ हात वस्त्र आणि राहाण्यास चार हात जागा, इतकेंच सर्वांचे उपयोगांत येतें बाकीचें सर्व तसेंच पडून राहते परन्तु त्याचा साभाळ करण्याकरिता काळजी करावी लागतें मग जास्त असून काय कामाचें ? व त्यापासून सुख तरी काय मिळणार ? असें जाणून प्राप्त झालेल्या पदार्थावर संतोष ठेवावा पहा—रानातले

तात तसेंच दुसऱ्याची कीर्ति ऐकून स्वतःची तळमळ होते या मानसिक विकारास मत्सर असें ह्मणतात मत्सरी माणसाचें कोणतेंही कार्य फलद्रूप होत नाहीं जें काहीं सुखदु ख जगात अनुभविण्यास मिळतें तें पूर्वकृत पुण्याचें फळ असतें याबरून जें दुसऱ्याचें वाईट इच्छितात ते कुवासनेच्या योगानें अशुभ कर्मा चा बध होऊन त्याचें फळ त्याना पुढील जन्मीं अवश्य भोगावें लागतें, ह्यात काहीं सशय नाहीं असा हा ' मत्सर ' शत्रु फसवून दु ख देणाग आहे त्यास जिकण्याकरता धैर्य धारण करून विचार करावा कीं रे प्राण्या ! तू पूर्वे जन्मीं काहीं पुण्य केलें नाहींस ह्मणून द्रव्याची पुत्राची सुखाची तुला न्यूनता राहिली आता दुसऱ्याचा हेवा केल्यानें किंवा पश्चात्ताप केल्यानें अथवा रडल्यानें कोणता फायदा होणार ? उलट कर्मबन्ध होतो तुला हें दु ख सोसवत नाहीं

व वाईट वाटतें तरी पूर्व जन्मींचें फळ या जन्मीं भोगावेंच लागेल परन्तु पुढील जन्माकरता या जन्मात काहीं दु खप्रद कामें करू नको

अभङ्ग

पापाची संचती । देहासी दडण ।
तुज नारायण । बोल नाहीं ॥१॥
पेरी कडू जीरीं । मागे अमृत फळें ।
अर्का वृक्ष केळें । कैसे येतीं ॥२॥
सुख अथवा दु.ख । भोग हा देहाचा ।
नाश हा ज्ञानाचा । न करावा ॥३॥
तुका ह्मणें आता । देवा का रुसावे ।
मनाला पुसावें । काय केलें ॥४॥

अशा सम परिणामाने धैर्य धारण करून सुखाचे वेळीं आनंद व दुःखाचें वेळीं चिंता न धरिता स्थीर विचारनें आलेले भोग भोगिले पाहिजेत आणि जर शेतात लॅस्ड पेटन नादूळ येतील ह्मणून इच्छा केली तर नीं मनन्न [illegible]

व्हानी " ा.दूळ मिळण्यावरता तादूळच पेरले
पाहिजेत त्याप्रमाणें सुख मिळविण्याची जर
इच्छा असेल तर पहिल्यानें सुख पेरीलें पाहिजे
ह्मणजे, जमिनीमध्यें दु:खरूप जें बी आहे तें
काढून अर्थात्--दुसऱ्याचे दु:ख हरण करून त्यांना
सुख दिलें पाहिजें त्या सुखी बीजाचा सुखरूप
वृक्ष दुसऱ्याचे अ ारात्म्यात उत्पन्न होऊन त्या
वृक्षाच्या सुखरूप फळाचा स्वाद आपणास मिळेल
यास्तव धर्म, दया सतोष स य, प्रमाणिकपणा,
नम्रता, सौजन्य इत्यादि गुणाला धारण करा ।
ह्मणजे या जन्मीं सुख भाडार उपभोगत अ
सता, पुढच्या जन्मातही सुखच सुख अनु
भवण्यास मिळेल, धर्मजागृती कायम राहील
आत्म्याचें कल्याण होईल आणि शिवसुख मो
क्षाची प्राप्ती होऊन अक्षय सुखसागरात िमग्न
व्हाल

---

## उपसहार अभंग.

—⁂—

पराचिया नारी। माउली समान।
मानिलीया धन। काय वेंचे ॥ १ ॥
न करिता परनिंदा। द्रव्य अभिलाष।
काय तुमचें यास वेंचें सागा ॥ २ ॥
बैसलिया ठाई ह्मणता राम राम।
काय होय श्रम। ऐसे सागा ॥ ३ ॥
खरें बोलता। कोण लागती सायास।
काय वेंचे यास। तुमचें सागा ॥ ४ ॥
संताचे वचनीं। मानिता विश्वास।
काय तुमचें यास। वेंचे सागा ॥ ५ ॥
तुका म्हणे देव जोड याचसाठीं।
अणिक ते आठीं। न लागेची ॥ ६ ॥

दया क्षमा शाती। तेथें देवाची वसती ॥ १ ॥
पाय धाजोनिया घरा। राहे धरोनीया धारा ॥ २ ॥

कीर्तनाचे वाटे । वराडीया ऐसा लोटे ॥ ३ ॥
तुका ह्मणे घडे । पूजा नाम देव जोडे ॥ ४ ॥

ह्या प्रमाणें स्वआत्म्याची दया करणें, वा सांगितल्या षड्रिपूच्या नादीं न लागून सद्गुण धारण करणें ही स्वात्म्याची दया आहे

असा धर्म धारण करून मनुष्यजन्माचें सार्थक करा, सुखी व्हा, हीच माझी विज्ञप्ति आहे

## अभंग

बोलिलों जें कांहीं तुमचिया हिता ।
वचन नेणता । क्षमा कीजे ॥ १ ॥
वाट दावी तया । न लगे रूसावे ।
अतित्याइ जीवें । नाश पावे ॥ २ ॥
निंब दिला रोग । तुटाया अंतरी ।
पोंवळिता वरी । आंत चरे ॥ ३ ॥
तुका ह्मणे हित । देखण्यासी कळे ।
पडती आंधळे । कूपामाजी ॥ ४ ॥

## साकी

सद्धर्म हा स्वीकार करूनी । सुखी सर्वजन व्हावे ॥
इह लोकीं यश सपति वरूनी । स्वर्ग मोक्ष मिळवावे ॥
ऐका भवि जनहो ! विज्ञप्ति धरा ही मन हो ॥ १ ॥

— * —

परम पूज्य श्री कहानजी ऋषिजी महाराजांच्या सम्प्रदायाचे बाल्ब्रह्मचारी मुनि श्री अमोलकऋषिजी महाराज रचित.

सद्धर्मबोध ग्रथ समाप्त ।

—***—

# जैनामूल्यसुधा.

## १ गुरुदर्शनाचा आनन्द

हा दिवससनाचे–ही चाल

हा दिवस चागला आला। मुनिरायाचा दर्शन झाला ॥ ध्रुपद ॥

पुण्याचा सूर्य उगवला। पापा तिम्र नाशला ॥

हृदय भरला, । प्रपंच आवरला ॥ अता परमार्थ करा तत्काल।

दवडू नका अमोल वेळाला ॥ हादिवस ॥१॥ इति ॥

—*०*—

## २ तीन तत्वाची ओळख

यदू नीगाला ॥ ही चाल

विनवीतो सकळाला। ऐका माझे वचना ॥

सोडा कुकर्माला। स्वीकार कराहो आपण धर्माला ॥ ध्रुपद ॥

विसरू नका हो भव्यतारण्य । अरिहंत देवाला ॥
अरिहंत देवाला । स्मरा घेउनी माळाला ॥
विनवितो ॥ १ ॥

निर्ग्रन्थ गुरूची निश दिन तुम्ही । करित
जा सेवाला ॥
करित जा सेवाला । देऊनी वाछित दानाला ॥ विन ॥
धर्म श्रेष्ट हा हृदयमधी । ठेवा हो दयाला ॥
ठेवाहो दयाल । हणु नका पामरजीवाला ॥ विन ॥
तीन तत्त्व हें शुद्ध ओळख । तात्पर्य जैनाला ॥
तात्पर्य जैनाला । पाहिजे मोक्षपुरी ज्याला ॥ विन ॥४॥
श्रावककुळ हाच सार आहे ध्या । अलभ्य लाभाला ॥
अलभ्य लाभाला । अमोलक ऋषि ह्मणाला॥विन ॥५

## ३ उपदेशी--पद.

न्यर्थ आम्ही जापला-ही चाल

सार्थक करा । येऊनी जन्माला ॥ सार्थक ॥ध्रुपद॥
लक्ष चवऱ्याशी योनीं फिरता ।
श्रावक कुळिं आला ॥ सा॰ ॥ १ ॥

शुद्ध देव गुरु धर्म स्वीकारी ।
सोडा खोट्याला ॥ सा ॥ २ ॥
वैभव संपत्ति सतती पाहुनी ।
करू नका गर्वाला ॥ सा ॥ ३ ॥
जाइल काया माया सर्व ही ।
अस्थिर समजा याला ॥ सा ॥ ४ ॥
सोयरे धायरे देहाचे संबंधी ।
पाहाती पैकाला ॥ सा ॥ ५ ॥
धर्म एक हा साह्यी जीवाला ।
करा सर्व त्याला ॥ सा ॥ ६ ॥
अमोल ह्मणे परमार्थ करा तुह्मी ।
सुधारा आयुष्याला ॥ सा ॥ ७ ॥

## ४ सद्बोध--पद

दोन प्रहर रात्रि झाली ॥
दोन दिवसाची संपत्ति सर्व ।
मिथ्या आहे पसारा ॥
लुब्ध झाले याचे मध्यी ।

स्व स्वरूप विसारा ॥ ध्रुपद ॥

कोणी तुमचा आहे येथें ।
सागा विचार करुनी ॥
ज्याच्या साठीं करिता कर्म ।
त्याची ममत्व धरूनी ॥
गोड गोड बोलुनीया । घेती संपत्ति हिरवूनी ॥
अती एकठा हा प्राणी । जासिल नर्क मरूनी ॥१॥
धर्म पुण्य करण्यास्तव । नरजन्म लाघला ॥
मोह मायाचा येथें फद । दिवसों-दिवसी वाढला ॥
अज्ञानी त्यात गुतुनी । अहित संपादला ॥
ज्ञानी पुरुष महात्म्यानीं । आत्मअर्थ साधला ॥२॥
करा करा आता सर्व । स्वहितासी लवकरा ॥
गेल्या त्याचा फिकर सोडा । जोडा सत संग जरा ॥
तोडा मोहो मायाचा फासा । आशा फद्राला हरा ॥
अमोल ऋषि म्हणे तरी । होईल आत्म्याचा जग ॥३॥

---

## ५ सद्बोध दिंडी.

उत्तम नर ते एकांत धर्म सेवी। मध्यम नर ते धर्मार्थ उभय ठेवी ॥
अधम नर ते परपचात जन्म शोवी।
कनिष्ट जो तो अकृतात आयु गोवी ॥ १ ॥
धर्म एकच आहे सहायी ह्या जीवाला।
समजा स्वार्थी सर्वही स्वजनाला ॥
कसा फसलासी मोहो मायामध्यें प्राणी।
संपत्ति संतति ही अनर्थाची खाणी ॥ २ ॥
नर जन्ममधीं धर्म करित नाहीं।
त्याचा जन्म पशुतुल्य जात याही ॥
आहार निद्रा भय मैथुन इष्टी मोहो ॥
सर्व पशुतुल्य नरदेहाचा केला द्रोहो ॥ ३ ॥
करा लवकर आता आत्महित शाणा।
आयुचा नाश होत नित्य मनामधीं जाण।
गेली घटिका ती पुन्हा येती नाहीं।
म्हणुनी करून घे धर्म तुझा सहाही ॥ ४ ॥

प्रमाणिकपणा ठेवुनी जगीं वागा। मद्गुरुभक्त व्हा धर्ममार्गि लागला ॥
अहिंसा सत्य ब्रह्मचर सुबोध जगीं मगा ।
ऐकुनी अमोल वाक्य शीघ्र अता जागा ॥ ५ ॥

---

## ६ स्वहिताचा पद.

चलाचला मिळुनिया-ही चाल

करा करा मिळुनिया । स्वहित आपला जनहो॥ध्रु ॥
अशी सन्धी दवडु नका वधु ।
हा जन्म रत्नाकर सिन्धु ॥
घ्या घ्या लवकर लाभ ।
द्या द्या अभय उत्साभ ॥ करा ॥ १ ॥
निंदा लबाडी चाहाडी सोडा ।
प्रीति सत धर्मी सग जोडा ॥
याया कीर्तनाचें ठाव ।
ऐका भगवताचे नाव ॥ करा ॥ २ ॥
दया अनाथ पामरांची कराहो ।

## ५ सद्बोध दिंडी.

उत्तम नर ते एकांत धर्म सेवी । मध्यम नर ते धर्माधर्म उभय ठेवी ॥
अधम नर ते परपचात जन्म क्षोवी ।
कनिष्ट जो तो अकृतांत आयु गोवी ॥ १ ॥
धर्म एकच आहे सहायी ह्या जीवाला ।
समजा स्वार्थी सर्वही स्वजनाला ॥
कसा फसलासी मोहो मायामध्यें प्राणी ।
संपत्ति संतति ही अनर्थांची खाणी ॥ २ ॥
नर जन्ममधीं धर्म करित नाहीं ।
त्याचा जन्म पशुतुल्य जात पाहीं ॥
आहार निद्रा भय मैथुन इंद्री मोहो ॥
सर्व पशुतुल्य नरदेहा वा केला द्रोहो ॥ ३ ॥
करा लवकर आता आत्महित शाणा ।
आयुचा नाश होत नित्य मनामधीं जाण।
गेली घटिका ती पुन्हा येती नाहीं ।
म्हणुनी करून घे धर्म तुझा सहाही ॥ ४ ॥

प्रमाणिकपणा ठेवुनी जगीं वागा। सद्गुरुभक्त व्हा धर्ममार्गी लागला ॥
अहिंसा सत्य ब्रह्मधर सुबोध जगीं सगा ।
ऐकुनी अमोल वाक्य शीघ्र अता जागा ॥ ५ ॥

---

## ६ स्वहिताचा पद

चलाचला मिळुनिया-ही चाल

करा करा मिळुनिया । स्वहित आपला जनहो॥धृ ॥
अशी सन्धी दवडु नका वधु ।
हा जन्म रत्नाकर सिंन्धु ॥
घ्या घ्या लवकर लाभ ।
धा धा अभय उत्साभ ॥ करा ॥ १ ॥
निंदा लबाडी चाहाडी सोडा ।
प्रीति सत धर्मी संग जोडा ॥
याया कीर्तनाचें ठाव ।
ऐका भगवताचे नाव ॥ करा ॥ २ ॥
दया अनाथ पामरांची कराहो ।

हिंसा त्यागा बोलावें सदा खरें हो ॥
तजा तजा परनार ।
संतोष ठेवावर धार ॥ करा ॥ ३ ॥
नरजन्म दवडूं नका वाया ।
हीं रत्न अमोल शिक्षा घ्याया ॥
धारा धारा आत्मज्ञान ।
मिळेल तुह्मा शिवस्थान ॥ करा ॥ ४ ॥

## ७ गोरक्षा

व्यर्थ अशी अवळा-ही चाल

हणीता का गायाला ।
कृतघना ! हणीता ॥ ध्रु० ॥
जगाची आई ह्मणावी गाइ ।
पोषीती कायाला ॥ कृत ॥ १ ॥
दूध दही ताक लोणी खवा तूप ।
देती ही खायाला ॥ कृत ॥ २ ॥
सेणानें घर स्वच्छ करी ती ।
मुत्र रोग जायाला ॥ कृत ॥ ३ ॥

सेतींत आंक्षें वाहाण्यात पुत्र तस्य ।
होती ते साह्याला ॥ कृत ॥ ४ ॥
मेल्या नन्तर चर्म करूनी ।
रक्षी ती पायाला ॥ कृत ॥ ५ ॥
यास्तव सर्व सुज्ञ जनहो ।
न द्या कषायाला ॥ कृत ॥ ६ ॥
स्वआत्मतुल्य रक्षा हो त्यासी ।
अमोल सुख घ्यायाला ॥ ७ ॥

## ८ हितशिक्षा–गजल

असा उत्तम जन्म तुह्मी दवडिता कसा ।
पुन्हा पुन्हा मिळेल का अवतार हो असा ॥ग्रु०॥
हा ससार मायाजाल नका हो फसा ।
फसल्यानर सुटणें कठिण जैसे फाससा ॥ असा ॥
घर स्वजन धन तुझा, आहे स्वपन जसा ॥
शाश्वत मानुनी लुब्ध झाला सेंवूडात माशा ॥ असा
अभक्षाचे करित भक्ष । जैसे राक्षसा ॥

पर धन पर स्त्री याशी। लुटित वेडा तसा ॥ असा ॥
नर्क कुडात जाउल मार खाइल यमठसा ॥
मग गुरुची सई येईल। सागू फाड घस ॥ असा ॥
करा धर्म जैन परम उतारा नोहो नशा ॥
ऋषि अमोल म्हणे, अता रिजा हो बसा ॥अ०॥५

## ९ जिनस्तुती

तारी तारी मला– ही चाल

वदा वदा सदा जिनरायारे ॥ वदा ॥ ध्रु० ॥
भ्रमत आला मानव झाला उत्तम कुळीं जन्म या।
नका नका दवडू जन्म वायारे ॥ वदा ॥ १ ॥
कुमति तजावे सुमति बरावे, करा सखा धर्म या॥
धरा धरा अता गुरुपायारे ॥ वदा ॥ २ ॥
कीर्तन ऐकावे नाम स्मरावे, अमोल म्हणे मित्र या॥
होईल होईल तुझी सफल कायारे ॥ वदा ॥ ३ ॥

## १० ऊक्कड--बोध पद

आर्य नरा—ही चाल

सुज्ञ नरा, प्रभु स्मरा, धर्म करा हो जैन वरा ॥ध्रु ॥

कुगामना मनिं नका धरा ।
विषयतृष्णाचे मूल हरा ॥ सुज्ञ ॥ १ ॥
हलकट भाषण नका करा ।
सद्गुणाते हृदय भरा ॥ सुज्ञ ॥ २ ॥
सत्संग करूनी ससार तरा ।
अमोल म्हणे मिळेल मुख त्वरा॥ सुज्ञ ॥३॥

## ११ सवैया

धिक भूमि वरी, जन्म त्याचा खरी,
नाहीं केल जरी, जाने भूतदया ॥
पोषिले तन, सम्पादिले धन
सतोषीले मन, पर पाहू क्षया ॥
नाहीं जिन जपे, नित्य ताप तपे ।
ऐसे आयु क्षपे, पुढे यमभया ॥
अमोल म्हणे । व्यर्थ त्याचे जीणे ।
एक धर्मविण, जन्म गेला लया ॥ १ ॥

## १२ शाण्याला-उपदेश

गुरूने घता म्या-ही चाल

गड्या तू हइ शाणा हइ रा,

धर्मांत कर्मे झाला काणा ॥ ध्रु० ॥
वस्त्र दागीने परखूनी घेतो ।
वाईट असले तें टाकूनी देतो ।,ग ॥ १
गोड गोड पदार्थे खातो ।
सुन्दर कान्तावर मन जातो ॥ गड्या ॥ २ ॥
दुसऱ्यास उपदेश बहु करितो ।
वैभवाचा गर्व मनिं धरितो ॥ ग ॥३॥
परतु देवगुरुधर्माची ।
नाहीं परीक्षा केली हिताची ॥ गड्या ॥४॥
धिक धिक तुझा शाणपणा ।
मानवरूप वानर तुला ह्मणा ॥ ग ॥५॥
अता दांभिक भक्ति सोडोनी ।
करा काहि आत्महितजनी ॥ ग ॥ ६ ॥
अमोल ह्मणे धरा सुबोध ।
सत्सगतिनें हृदय शोध ॥ ग. ॥ ७ ॥

## १३ जैन धर्म सबधी-लावणी

अन्ध पशु या नाहीं-ही चाल

ऐका भव्य जन नित्य प्रत तुह्मी ।

श्रीजिनवचनाला ॥
श्रद्धा ठेवुनी हृदयामधीं त्यागा मिथ्याला ॥ ध्रु ॥
द्वादश परिषद् मधीं दावीला, द्वादश अंगाला ॥
तत्त्वार्थ ऐकता संशय, पावती भंगाला ॥
अनित्य तन धन संपत्ति संतती न येती कामाला ॥
बंधु स्वजन सब आहे स्वार्थाचें, पाहाती दामाला ॥
कोणी नाहीं तुझा तू न कोणाचा एकटा तूं आला ॥
स्व स्वरूप विसरूनी प्राण्या, वेडा कसा झाला । ऐका ।
करसिल कर्म तें भोगविल तूही । भाग न कोणाला ।
मग रडल्यानें सुटशिल नाहीं । केल्या ऋणाला ॥
कोणी नाहीं सहायक धर्म वाचूनी । तुझे कामीं येयाला
वास्तव करून घे हित आपला । सोडा अनित्याला ॥
इन्द्रिय दमना जिनमग रमणा । घ्या या लाभाला ॥
श्रीजिन तारक दुःख निवारक । जा त्याच्या शरणाला
प्राणी रक्षा आणि खरें बोला । तजा अदत्ताला ॥
ब्रह्मचारी राहूनी ममत्व त्यागा । क्रोध उन्मत्ताला
कपट लोभ प्रेम द्वेष क्लेश । न द्या कुमाटाला ॥

चहाडी कोणाची निन्दा नका करू । रत्यारत्याला ॥
रात्री भोजन शल्य मिथ्यात्वचा सोडा हे पापाला ॥
जिनाज्ञा अगीकार केल्यानें । पावसी मुक्ताला ॥ ऐका
शास्त्र सुधारस अनुभव कूपी । रुचतील भव्याला ॥
याला प्राप्तुनि कर्माला त्रासुनी, आनदमयी झाला ।
अधम जनाचे हृदयीं न रुचे, पासील त्रासाला ॥
शुद्ध मार्ग सोडूनी अडराणी, गेल्या पावसी नर्काला
यास्तव मान्य करा मज वचन, सुखकर मनुजाला ॥
ऋपि अमोलक हित धरूनी, सागतो सर्वाला । ऐका ।

—:०—

## १४ श्रावकाला बोध--लावणी.

न्याय होत नाही पहा—ही चाल

श्रावककुळीं जन्म येउनी, काय तुझी केला ।
कुधर्म आचरुनी जन्म फुकट हा गेला ॥ ध्रु० ॥
दगड माती पानी वृक्षें । देव जानुनी ।

तुह्मा सारखे गृहस्थ । त्याला गुरू मानुनी ।
हिरवीता द्रव्य पूजा सेवामध्ये अज्ञानी ।
तन ' धन मध्यें गर्के, पोपीं कायेला । श्रा ॥

षट कायाचे वध करूनी, धर्म मानीता ॥
ग्राम पहाड कुडाला कसें तीर्थ जानीता ॥
शुद्ध बोध ऐकूनी आपली रूढी तानीता ॥
गेला मेला व्यर्थ जन्म कुतर्क सेवाला ॥ श्रा॥

शुद्ध देव गुरु धर्माची परीक्षा ना करी ।
त्याचा जन्म आहे जगीं वनचरापरी ॥
बुडाला खरोखरी तो कुमति आचरी ॥
जरा-नरा-अजुनी-चेत, दीर्घ दृष्ट फैला ॥ श्रा ।३।

हित चित्त धरूनी तुला ही गोष्टी सांगतो ॥
अरिहंत देव आहे गुरू निग्रंथ मानतो ॥
श्रेष्ट दया धर्म हें अमोल ठानितो ।
करा-त्वरा-याला तुह्मी, उद्धारा आत्म्याला ॥ श्रा ॥४॥

— ः —

## १५ सुखदाता–लावणी.

मेळ्याचे लोग–ही चाल

सुखेच्छु लोक सर्व मिळुनी जैन धर्म करा ।
धर्म करूनी कुमति हरूनी सुमति मग वरा॥ध्रु॥
फार पुण्ययोगें उत्तम कुळें अवतरा ।
सत्संग शास्त्र श्रवण करा लवकरा ॥
जैन धर्म सारखा नाहीं आणखी दूसरा ।
त्याला धार, होईल पार,सागूमी खरा॥ सुखेच्छु ।१।
आई बाप बहिन बन्धु बायको नवरा ॥
त्याचेसाठीं करित पाप मानूनी आसरा ॥
सोयरे स्वार्थी सर्व वित घेती हरा ॥
ज्ञानदृष्टी करूनी पहा आपुण अहो जरा॥ सुखे ॥२॥
देह क्षणभगूर लक्ष्मी राहाती ना स्थिरा ।
विषयभोग गोड वाटत आहे ते गरा ॥
त्याचे मधीं लुब्ध काय बनले पामरा ॥
आता तरी सोडा त्याला स्वहिता स्मरा ॥ सु ॥३॥
धर्मविण मनुष्य ते तरी शेंपूटविण खग ।
भूमीला भार खायाला काळ जैसे वनचरा ॥

गला त्याचा जन्म व्यर्थ पापढग भरा ॥
जामिल यमपुरी मरूना ही भीती धरा ॥ सुखे ॥४
अरिहत देव गुरू निर्ग्रन्थाची सेवा आदरा ॥
दयामूल धर्म धार परमार्थ करा नरा ॥
सत्तावन माघ तेरशी घोडनदी नगरा ॥
अमोल ऋषि सगा अता सुखी व्हा त्वरा ॥ सुखे ॥५
परमपूज्य श्री कहानजी ऋषिजी महाराजांच्या सम्प्रदायाचे

बाल ब्रह्मचारी पण्डितमुनि श्रीअमोलकऋषिजी
महाराज रचित " जैनामूल्यसुधा " तीले,
महाराष्ट्रीक भाषेची पद समाप्तम्

ॐ शाति शाति शाति.

---